# खडकांतले पाझर

लेखक
पं. महादेवशास्त्री जोशी

★

द्वितीयावृत्ति, १९५५

★

मूल्य अडीच रुपये

एस्. जगन्नाथ आणि कंपनी, पुणें २

# कथानुक्रम





प्रकाशक :
**द. श्री. गानू,**
एम्. जगन्नाथ आणि कंपनी,
९२८ नारायण पेठ, पुणें २

मुद्रक :
**श्री. ज. गानू,**
राजगुरु प्रेस,
४०५ नारायण पेठ, पुणें २

अर्पण

मद्रास येथील माझे प्रिय सुहृद्

श्री. बाबुराव फडके

व

श्री. सौ. इंदिराबाई फडके

या उदार व प्रेमळ दंपतीस

—लेखक

# मुळारंभीं



१९४१ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'वेल-विस्तार' या पहिल्या कथा-संग्रहानंतर पुरत्या आठ वर्षांनीं माझा हा दुसरा संग्रह प्रसिद्ध होत आहे. या मधल्या काळांत माझीं इतर कांहीं पुस्तकें प्रकाशित झालीं असलीं आणि त्या प्रत्येक वेळीं मला आनंद झाला असला तरी हें पुस्तक प्रसिद्ध होतांना मला घडणारा आनंदानुभव कांहीं निराळ्याच जातीचा आहे. कारण —

कथालेखन हा माझा आवडता विषय आहे.

'बंधुभाव' ही गोष्ट वगळल्यास या संग्रहांतल्या बाकीच्या गोष्टी गेल्या तीन वर्षांतल्या आहेत. १९४८ सालीं पुणें येथील चित्रशाळेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'ध्रुव' मासिकानें कथास्पर्धाअंक काढला होता. त्यांत प्रस्तुत संग्रहांतली 'धन आणि मन' ही गोष्ट पहिल्या बक्षिसाला पात्र ठरलेली आहे.

* * *

प्रस्तुत कथासंग्रहाला दुसऱ्या आवृत्तीचें भाग्य लाभत आहे ही आनंदाची गोष्ट होय.

या पुस्तकाचें बाह्यांग चित्रकार श्री. दलाल यांनीं भूषविलें याबद्दल मी त्यांचाहि ऋणी आहे.

वर्षप्रतिपदा,
पुणें.
दि. २४-३-५५

— लेखक



## १ : : खडकांतले पाझर

श्रावणांतले दिवस होते. सकाळचे नऊ वाजून गेले होते. पाऊस धूम-धार पडत होता. समोरून आडव्या येणाऱ्या सूं सूं जलधारा छत्रीला न जुमानतां अंगावर आदळत होत्या. बेळगांवच्या त्या तांबडमातीच्या रस्त्यांतून फेसाळ पाण्याचे ओहोळ चालले होते. एकेक पाऊल कष्टानं पुढं टाकावं लागत होतं. मला ज्या वेळीं निकडीची घाई होती त्याच वेळीं निसर्ग असा आडवा आला होता.

सिव्हिल हॉस्पिटलमध्यें काल दाखल केलेली सुमा माझी वाट पाहत बसणार होती. तिचं ऑपरेशन करायचं कीं नाहीं तें सिव्हिल सर्जन आज मला सांगणार होता. अन् तो निर्णय ऐकून धांवत पळत मला बिऱ्हाडीं यायला हवं होतं. कारण तेवढ्यांत बाळाची झोंप पुरी होणार होती आणि ओळखीचं कोणी घ्यायला नाहीं म्हणून तो रडून आकांत करणार होता. "तो उठला तर दुधाची बाटली त्याच्या तोंडांत दे" असं इंदूला मी सांगून आलों होतों; पण पांच महिन्यांच्या अर्भकाची लहर कशी फिरेल हें कोण सांगूं शकणार? छेः! हॉस्पिटलमधें आईबरोबर तान्ह्या मुलाला ठेवून घेत नाहींत ही किती गैरसोय आहे! माय-लेकरांचीताटातूट त्यांना करवते तरी कशी?

दहा वाजायच्या सुमाराला हॉस्पिटलच्या फाटकांतून मी आंत शिरलों. प्रथम बायकांच्या वॉर्डमधें जाऊन सुमाची भेट घेतली. मला पाहतांच

तिचं तोंड उजळ झालं असलं तरी तिचे डोळे लाल दिसले. त्यावरून मी ताडलं कीं, कालपासून ती सारखी रडत असावी. बाळ आनंदांत असल्याचं शुभ वर्तमान तिला सांगून मी व्हरांड्यांतल्या बांकावर येऊन बसलो.

माझ्या शेजारीं आणखी किती तरी रोगी बसले होते आणि थोरले साहेब कव्हां येतील याची वाट पाहत होते. मीहि तेंच करीत होतों. अर्ध्या तासांतच माझा जीव कंटाळला. मनांत आलं कीं, सुमा कालपासून इथें पडून आहे ती किती कंटाळली असेल ! आंत पाहावं तों समोरच्या वार्डांत बरच रोगी असहाय्यपणें पडले होते अन् त्यांतले कांहीं दबलेल्या आवाजांत कण्हत होते. बाहेर पाहावं तों पाऊस ओसरला होता; पण आकाश ढगांनीं कोंदाटलेलं तसंच होतं. मधूनमधून गार वाऱ्याचे झोत येत, त्यामुळें आजूबाजूला शिंपडलेल्या फिनाईलचा उग्र भपकारा नाकांत अधिकच भरत होता. शुभ्र पातळें नेसलेल्या परिचारिका इकडून तिकडे येरझारा करीत होत्या; पण त्यांच्या कपाळावरच्या आंठ्या अन् त्रस्त मुद्रा पाहतांना आंत कांहींतरी टोंचल्याची जाणीव होत होती. हें सगळं उदास वातावरण अन् वर सिव्हिल सर्जन काय सांगेल त्याची चिंता, यांनीं माझं हृदय भारावल्यासारखं झालं.

साडेअकरानंतर माझा नंबर लागला अन् दारावरच्या पट्टेवाल्यानं मला आंत बोलावलं. मी भीत भीत एका भरदार नि धिप्पाड अशा पुरुषाच्या टेबलापुढं जाऊन उभा राहिलों. टेबलावरच्या एका कागदावरून त्यानं नजर फिरविली आणि अर्ध्या चष्म्याच्या वरच्या बाजूनं माझ्याकडे रोखून पाहात प्रश्न केला.

" सुमति शिवराम परांजपे ही तुमची कोण ? "

अरे बापरे ! किती तीक्ष्ण होते ते डोळे ! माझी तर त्रेधा-तिरपीट उडाली. सुकलेले ओठ जिभेच्या टोंकानं ओले करून मीं कसंबसं उत्तर दिलं.

" माझी बायको. "

" अगदीं नक्की का ? "

" होय साहेब. "

" किती दिवसांपासून पोटदुखी सुरू आहे? ताप केव्हांपासून येऊं लागला? "

" गेल्या गरोदरपणापासून. बाळंतीण झाल्यावर ताप यायला लागला!"

" मग इतके दिवस काय झोपा काढीत होतां? "

मीं मान हालवून नाहीं म्हटलं नि सांगूं लागलों.

" मी कोकणांतला राहणारा. अगदीं खेडं गांव आहे आमचं. सह्याद्रीच्या पायथ्याशीं. तिथें कुठले डॉक्टर अन् वैद्य? झाडपाल्याचीं औषधं दिलीं अन् शिवाय —"

साहेबांनीं कागदावरचा कांचेचा गोळा या चवड्यावरून त्या चवडीवर आपटला. ' हुं:ऽ ' असा एक हुंकार सोडून ' मूर्ख आहेस तूं ' अशा अर्थाचं स्मित केलं अन् म्हटलं.

" मला तुमचं आख्यान ऐकायला वेळ नाहीं. तुमच्या बायकोचं दुखणं कठिण अवस्थेला गेललं आहे. पोटाचं ऑपरेशन केलं पाहिजे; पण तूर्त तें करणं धोक्याचं आहे. ती इतकी अशक्त झाली आहे कीं, ऑपरेशनच्या टेबलावरच प्राण सोडील. तिला कांहीं दिवस इथें ठेवा. औषधानं ताप हटला अन् थोडी ताकद आली तर मग ऑपरेशनचं पाहूं. "

ते माझ्या होय-नाहींचीसुद्धा वाट पाहायला थांबले नाहींत. लगेच त्यांनीं दुसरा पेशन्ट आंत पाठवण्याचा पट्टेवाल्याला हुकूम सोडला. एक सुदामदेव खोकत खोकत आंत आला अन् मी बाहेर पडलों. साहेबाचे ते शब्द अजून आंत आंत घुसत होते. ' ऑपरेशनच्या टेबलावर प्राण सोडील!' सुमा माझी बायको असली तरी त्यांच्या दृष्टीनं एक सामान्य रोगी. तिच्या बऱ्यावाईटाचं सोयरसुतक त्यांना कसलं असणार! माझे मात्र हातपाय खचले त्या शब्दांनीं. सुखदुःख सगळं भावनेच्या पोटीं असतं हेंच खरं!

" ऑपरेशन तूर्त होत नाहीं. तुला कांहीं दिवस इथें राहिलं पाहिजे." असं जेव्हां सुमाकडे जाऊन मीं तिला सांगितलं, तेव्हां ती ताड्कन् उठून बसली अन् म्हणाली.

" ऑपरेशन होत नसलं तर मला बिऱ्हाडीं घेऊन चला. मी इथं मुळींच राहणार नाहीं. मी महिनाभर जगायची असेन तर इथें राहून पंधरा दिवसांतच मरेन. मला हें इस्पितळ खायला येतं. विलक्षण भीति वाटते. माझं काय व्हायचं असेल तें बाळाच्याजवळ असतांना होऊं दे—"

पांच मिनिटांपूर्वी डॉक्टर तसं बोलले होते. आतां सुमा असं बोलत होती. दोघांच्याहि उद्गारांत मरण पुढं आलं होतं. माझ्या पहिल्या जखमेवर दुसरा घाव पडला होता. मी तिच्याकडे बावरलेल्या नजरेनं पाहूं लागलों. तिची रोजची ताप चढण्याची वेळ झाली होती. त्यामुळें तोंड तांबूस दिसत होतं अन् श्वासाचा वेग वाढला होता. डोळे माझी विनवणी करीत होते. अवघ्या एका दिवसांत सुमा किती भकास दिसूं लागली होती !

मला तिचं मन मोडवेना. मी असिस्टंट डॉक्टरला भेटून सगळी हकीगत सांगितली आणि त्याची परवानगी मिळविली. लगेच आम्ही दोघं त्या रोगांच्या साम्राज्यांतून बाहेर पडलों. थोड्याच वेळांत आमची सारवट इंदूच्या घरापुढें येऊन थांबली. आंतून बाळाचं रडणं अन् इंदूचं त्याला समजावणं असे दोन आवाज ऐकूं येत होते. सुमा केव्हां उतरली अन् घरांत धावली तें मला कळलंसुद्धा नाहीं. उंबरठा ओलांडतांना मीं तिला पाहिली आणि विस्मयानें उद्गारलों. " कुठून हिला एवढी ताकद आली !"

सुमानं बाळाला हृदयाशीं घट्ट कवटाळलं होतं. 'रडूं नको. मी आलें. माझ्या बाळासाठीं आलें.' अशा मधुर शब्दांनीं ती त्याला समजावीत होती. तोहि 'हुंहूंऽऽ, हुंहूंऽऽऽ' करीत रडं थांबवण्याच्या बेतांत आला होता. सुमा त्याच्यासकट आपणहि डोलत होती. एका डोळ्यानं रडत होती अन् दुसऱ्या डोळ्यानं हंसत होती. आणि मी— ?

इंदूनं लगेच ताजा भात करून आम्हांला जेवायला वाढलं. तिच्या घरीं आम्हांला परकेपणा मुळींच नव्हता. आम्ही दोघं शेजारीं शेजारीं जन्मलों होतों अन् सगळं बालपण एकत्र घालवलं होतं. तिच्या लग्नानंतरच आमची गट्टी फुटली होती. मी अजून 'खेडवळ'च असलों तरी ती मात्र एका भिक्षुकाची सौभाग्यवती बनून बेळगांवसारख्या शहरांत वास्तव्य करायला आली होती. मी कधीं बेळगांवला आलों तर तिच्याकडेच उतरत असें. नाहींतर ती मला रागं भरे अन् 'माहेरीं आल्यावर तुझ्या घरची पायरी चढणार नाहीं,' म्हणून धमकी घाली.

तिचे यजमान गोपाळभटजी धंद्यानं भिक्षुक; पण एरव्हीं दिलदार गृहस्थ. दोघांनाहि पैशापेक्षां माणसाचाच लोभ अधिक होता. माझी त्यांची आतां पुष्कळ घसट झाली होती. इंदूची माझ्याविषयींची आपुलकी लक्षांत घेऊन ते मला आपला मेहुणाच समजत होते. आमच्या थट्टा–मस्करींत आपणहि सामील होत होते. आणि म्हणूनच अशा कठिण परिस्थितींत प्रथम मीं इंदूच्या घराचा आसरा घेतला होता.

दोन महिने, म्हणजे भातकापणीचा हंगाम येईपर्यंत, बेळगांवांत राहून सुमाला चांगल्या डॉक्टरचे औषधोपचार करायचे तर मला स्वतंत्र बिऱ्हाड करणं भाग होतं. इंदूच्या भलेपणाचा अधिक फायदा घेण्याची माझी इच्छा नव्हती. मीं दोन घांस खाल्ले आणि देह थकला होता तरी तशा पडत्या पावसांत जागा शोधण्यासाठीं बाहेर पडलों. पण संध्याकाळपर्यंत पायांची चाळण करून आणि ओळखीदेखीच्या लोकांना गळ घालूनहि मला टीचभरसुद्धा कुठें जागा मिळाली नाहीं.

गारठ्यानं कुडकुडत मी घरीं आलों. धाबळी पांघरून निपचित पडून ऱ्हावं असं मला वाटलं आणि त्याच क्षणीं सुमाची साडी नि बाळाचे कपडे धुवायचे राहिले आहेत याची आठवण झाली. पण विहिरीवर जातों तों तिथें कपडे नव्हते. मीं सुमाला म्हटलं.

"अशा पावसांत तूं कपडे धुऊन घातलेस, हें बरं नाहीं केलंस."

" मीं नाहीं, इंदुवन्संनींच पिळून आणले ते. "

कातरवळ झाली होती अन् इंदु देवापुढें दिवा लावतांना स्तोत्र म्हणत होती. " दीपो हरतु पापानि संध्यादीप नमोऽस्तु ते " मीं उंबरठ्याच्या बाहेर राहूनच नमस्कार केला. तो नमस्कार देवघरांतल्या देवाला होता का त्या पाठमोऱ्या उभ्या असलेल्या दयेच्या देवतेला होता तें माझ्या अंतरात्म्यालाच ठाऊक !

रात्रीं जेवतांना मी त्या दांपत्याला म्हणालों, ' उद्यां दुपारच्या मोटारनं मीं घरीं जायचं ठरवलं आहे. सुमा हॉस्पिटलमध्यें राहायला कबूल नाहीं. अन् गांवांत कुठें जागा मिळत नाहीं. एकदा घरीं जाऊन पडावं हें बरं. मग काय नशिबांत असेल तें होईल. "

हें बोलतांना माझा गळा भरून आला होता. भाकरीचा तुकडा तोंडांतल्या तोंडांत घुटमळत होता. माझी त्या वेळची असहाय्य, दीन मुद्रा इंदूच्या लक्षांत आली असावी. तिनं फक्त एवढंच म्हटलं.

" उद्यां काय करायचं तें सकाळीं ठरवूं. तूं दमला आहेस आज खूप. जेव अन् स्वस्थ झोंप. "

तिचं हें उत्तर किती शहाणपणाचं होतं तें मला सकाळीं समजलं. रात्रीं तिनं आपल्या नवऱ्याचा विचार घेतला होता अन् उजाडत दोघांनीं मिळून अडगळीची तिसरी एक खोली त्यांच्याकडे होती ती मला मोकळी करून दिली होती.

खोलींत अंधार होता ; पण त्या दांपत्याच्या आत्मज्योतीच्या प्रकाशानं तो उजळून निघाला आहे असं मला वाटलं. अकरा वाजतां पूजेहून येतांना गोपाळभटजी आपटे डॉक्टरांना बरोबर घेऊन आले. ते गोपाळभटजींचे यजमानच होते. सुमाला तपासून घरीं जातांना ते भटजींना म्हणाले.

"बाईचं दुखणं कठीण आहे. पण आपल्या हातून होईल तेवढा प्रयत्न करूं. "

जें सिव्हिल सर्जननं कठोर शब्दांत सांगितलं तेंच आपटे डॉक्टरांनीं सहानुभूतीच्या शब्दांत सांगितलं होतं. तें ऐकून मात्र सुमाला इकडे आणायला विलंब केल्याबद्दल माझं मन मला टोचूं लागलं. गरिबी म्हणजे केवढं पाप आहे त्याची प्रथमच जाणीव झाली. हरघडी सुमाच्या चिंतेनं जीव खंगूं लागला. एखादे वेळीं डोळ्यांपुढें निराशेचा अंधार पसरे आणि त्यांत पुढचं भयाण भविष्य चमकून उठे. कधीं आशाहि वाटे कीं, सुमा या दुखण्यांतून बरी होईलच. आपण काय असं पाप केलं आहे देवाच्या घरीं—!

मीं डॉक्टरांचं मत सुमाला मुळींच कळूं दिलं नव्हतं. माझ्या काळजीनं ग्रासलेल्या मनाचा तिला थांगपत्तासुद्धा लागूं न देतां मी नेहमीं तिच्यापुढें आशेचीं रंगीत बाहुलीं नाचवीत असें. पुढचीं गोड गोड मनोराज्यं उभारायला बाळाची मला खूप मदत होई.

आळस झाडून मी सुमाची शुश्रूषा करूं लागलों. पण माझा सगळा वेळ एकट्या सुमाच्या वांट्याला कुठून येणार! बाळहि एक त्यांत मोठा भागीदार होता. सुमा रोगी म्हणून पराधीन, तर बाळ अर्भक म्हणून अगतिक. त्यामुळें त्या दोघांचं तंत्र नीट सांभाळतांना माझी अक्षरशः कुतरओढ होत असे. दिवस आला केव्हां अन् गेला केव्हां तेंसुद्धा कळायचं नाहीं.

दुःखांत सुख एवढंच होतं कीं, जेवण हातांनीं करावं लागत नसे. 'आमच्याबरोबर तुमचे दोन मुठी तांदूळ जास्त वैरायचे, त्यांत कसले आले आहेत श्रम?' म्हणून इंदूनं तो प्रश्न निकालांत काढला होता. घरांतच असल्यामुळें पावलोपावलीं तिची मला मदत होत होती. ती सगळं करीत होती; पण कांहींच केलं नाहीं असं भासवीत होती, याचं मला मोठं नवल वाटे.

घरून येतांना मीं दोनशें रुपये बरोबर आणले होते; पण ते कर्ज काढून. त्यासाठीं मला सुमाच्या सोन्याच्या बांगड्या गहाण ठेवाव्या लागल्या होत्या. त्यांपैकीं आतांपर्यंत पन्नास रुपयांची चटणी झाली होती. शहरांत आलों म्हणून मीं वावगा खर्च मुळींच केला नव्हता. हॉटेलांत

जाऊन एका आण्याचा 'सिंगल' सुद्धा कधीं घेतल्याचं मला आठवत नव्हतं. सुमाच्या औषधोपचारासाठींच या रकमेचा विनियोग झाला पाहिजे, तिला कांहीं कमी पडूं देतां कामा नये, असा माझा कटाक्ष होता. परत घरीं जातांना डॉक्टरचीं बिलं अन् इतर खर्च भागून जर पांच-पन्नास रुपये राहिले तर त्यांतून इंदूला एक सुंदर लुगडं घेऊन द्यायचं, हें मात्र मीं मनाशीं ठरवून ठेवलं होतं.

दिवसामागून दिवस जात होते. भाद्रपद महिन्याचा पहिला पंधरवडा संपत आला होता. पण सुमाच्या दुखण्यांत मात्र तिळाएवढाहि फरक पडला नव्हता. उलट ती पूर्वीपेक्षां अधिक खंगली होती. औषधाचे घोट घशाखालीं सारखे उतरत होते; पण ताप चढायचा तो चढतच होता. 'कधीं बरी होणार मी?' हा प्रश्न कितीतरी वेळां ती मला विचारी. डॉक्टरनीं बाळाला अंगावर पाजण्याची तिला बंदी केली होती. त्यामुळें कधीं एकदा बरी होईन अन् बाळाला परत पदराखालीं घेईन असं तिला झालं होतं.

मी तिच्या जर्जर हृदयांत आशेचं वारं भरीत होतों. आपल्या शब्दांचा तेवढासा परिणाम होत नाहीं असं दिसून आलं कीं, डॉक्टरांच्या नांवावर कांहीं वाक्यं दडपीत होतों. आणि सरतेशेवटीं सगळ्या अपेशाचं खापर माथीं फोडून घ्यायला हवा बिचारी तयारच होती. मी तिला म्हणें.

"अग, ही हवा पाहिलीस ना कशी कुंद आहे ती! त्यांत आणखी सारखी पावसाची रिपरिप. आजारी माणसाला बरं वाटायचे का दिवस आहेत हे? जरा उघडीप पडूं दे. नवरात्र उजाडूं दे. म्हणजे मग पहा. आपोआप तुझा ताप हळूहळू कमी व्हायला लागेल. दिवाळीला घरीं अन् भाउबिजेला भावाची वाट पहात दारीं—"

पण अशा रीतीनं तिला उमेद आणीत असतांना मी मात्र अंतर्यामीं कष्टी होत होतों. उत्साहाचं हें नाटक करूं लागलों कीं आतांशा माझ्या जिवाला यातना होत होत्या. माझी ही मनःस्थिति उघड करून मीं एक दिवस डॉक्टरनां विचारलं देखील.

" डॉक्टर ! सुमाचं तारूं कोणत्या तीराला लागणार आहे ? या का त्या ? काय तें स्पष्ट सांगा. मीं माझं काळीज निधडं केलं आहे. " त्यावर ते एवढंच म्हणाले, ' धीर सोडूं नका. कळेल अजून पंधराबीस दिवसांनीं. '

पुढें पक्षपंधरवडा सुरू झाला. गोपाळभटजींना ब्राह्मण म्हणून अन् इंदूला सवाष्ण म्हणून रोज पक्षाचीं बोलावणीं येऊं लागलीं. इंदू सकाळीं लवकर उठे, घाईघाईनं पण साग्रसंगीत स्वैंपाक करून मला जेवायला वाढी अन् मग सवाष्ण जाई. तें प्रेमळ मनानं वाढलेलं सुग्रास अन्न जेवतांना माझं मन अपराध्यासारखं खट्टू होई. तिला असा त्रास देणं बरं नव्हे म्हणून मग मीं एक निराळीच युक्ति काढली. संध्याकाळीं गोपाळभटजी घरीं आल्यावर मीं त्यांना म्हटलं.

" उद्यां माझ्यासाठींहि एखादं पक्षाच्या ब्राह्मणाचं आमंत्रण मिळत असेल तर घ्या. "

" कां हो ? भिक्षुकी करण्याचीशी बुद्धि आठवली ? "

" अहो, चारआठ आणे दक्षणा मिळाली तर तेवढाच किरकोळ खर्च भागेल. " मीं खरं लपवून खोटं कारण पुढें केलं.

आणि खरोखरच दुसऱ्या दिवशीं गोपाळभटजींचं सोवळं भांडं घेऊन मी पक्षाला ब्राह्मण गेलों. " अस्मत् पत्नी " म्हणून यजमानानं जेव्हां माझ्या हातावर दर्भ अन् माक्याचं पान ठेवलं तेव्हां कां कोणास ठाऊक, सुमाची ती अस्थिपंजर मूर्ति माझ्या डोळ्यापुढें उभी राहिली. श्रीखंडपुरीचा बेत होता, भाज्यांनीं अन् कोशिंबिरींनीं पान भरून गेलं होतं आणि यजमानहि आग्रहपूर्वक वाढीत होता. तरी मी त्या दिवशीं अर्धपोटीं उठलों. बिचाऱ्या यजमानाची पितर झालेली ती पत्नी स्वर्गांत संतुष्ट झाली असेल कीं नाहीं तें हरि जाणे !

घरीं आल्यावर सुमानं विचारलं.

" काय होतं जेवायला ? "

" श्रीखंड. "

" मला फार आवडतं श्रीखंड. आपण एक दिवस करायचं का ? "

" एवढ्यांत नाहीं. तूं बरी झालीस म्हणजे करूं. "

नंतर सतत दहा बारा दिवस 'श्राद्धभट' बनून मीं वेगवेगळ्या यजमानांच्या पितरांना स्वर्गांत मिष्टान्नांची रसद पोंचवली. त्यानंतर नवरात्र उजाडलं. पाऊस हटला. वारा आकाशाच्या प्रांगणांतून काळ्या मेघांना पिटाळून लावूं लागला. सूर्याचा मार्ग झाडून निघाला. धरित्रीच्या मुखावर शरदाची शोभा झळकली.

आणि त्याच सुमाराला सुमाची पोटदुखीहि कमी झाली. एक दिवस तापहि फारसा चढला नाहीं. थर्मामीटर लावून पाहिला तों पारा नव्याण्णवा-लाहि शिवला नव्हता. मीं हर्षोद्रेकानं सुमाला म्हटलं, " सुमा, तूं बरी झालीस ! देवानं आपलं गाऱ्हाणं ऐकलं. बाळाला आई परत मिळाली !! "

माझे ते उल्हासाचे बोल ऐकून सुमाचे डोळे पाणावले. मीं बाळाचा एक गोडसा पापा घेऊन त्याला दोन्ही हातांनीं झेललं, नाचवलं. कधीं नव्हतों तो मी त्या दिवशीं संध्याकाळीं फिरायला गेलों. चांगली रेसकोर्स-पर्यंत चक्कर मारली. भिंतीवरच्या सिनेमाच्या जाहिराती मन लावून वाचल्या. एका मैदानांत मुलं पतंग उडवीत होतीं त्यांचा आनंद थोडासा लुटून घेतला. दुसऱ्या एका ठिकाणीं मुली फेर धरून हदग्याचीं गाणीं म्हणत होत्या त्यांतलीहि थोडीशी गोडी चाखली. नंतर मारुतीच्या देवळापुढच्या कट्ट्यावर बसून दर्शनाला येणाऱ्या नरनारींचे घोळके प्रसन्न मनानं पाहिले.

आज माझ्या वांट्याला विश्वाचं उद्यान फुललं होतं. दाही दिशांत रम्य संगीत भरून राहिलं होतं. सेवेच्या बळावर आज मीं मृत्यूला जिंकलं होतं. परत येतांना मीं माळ्याच्या दुकानांतून गुलाबाचीं दोन सुंदर फुलं विकत घेतलीं. त्यांतलं पिवळं होतं तें मी इंदूला देणार होतों अन् तांबूस होतं तें सुमाला. ज्या हातानं मीं बेडपॅन उचललं त्याच हातानं तें सुवासिक गुलाबपुष्प सुमाच्या अंबाड्यांत खोंचतांना मला जो आनंद लाभणार होता तो मी आधींच कल्पनेनं उपभोगीत होतों.

दिवेलागणी झाल्यावर मीं घरांत पाऊल ठेवलं. माझ्या खोलींत जाण्याच्या आधीं स्वयंपाकघरांत डोकावून मीं इंदूला हांक मारली. पण तिचं प्रत्युत्तर आलं नाहीं. म्हणून तसाच आंत गेलों. पाहतों तों इंदू चुलीच्यापुढें बसून मुळूमुळू रडत होती. नेहमीं हंसतमुख असणारीं माणसं एखादे वेळीं रडायला लागलीं कीं किती केविलवाणीं दिसतात! ‘ काय झालं ग इंदू ? ’ म्हणून मीं विचारतांच तिला अधिकच हुंदका आला. मी चित्रासारखा दोन मिनिटं तिथें स्तब्ध उभा राहिलों आणि मुकाट्यानं निघून खोलींत आलों.

सुमा छपराकडे डोळे लावून स्वस्थ पडली होती. बाळ तिच्या कुशींत झोंपेसाठीं कुरकुरत होता. मी आल्याचं कळूनहि तिनं मला कांहीं विचारलं नाहीं. मलाहि बोलावंसं वाटलं नाहीं. मीं तीं गुलाबाचीं फुलं कोपऱ्यांत फेंकून दिलीं. बाळाला मांडीवर घेऊन भिंतीशीं बसलों अन् त्याला थोपटून निजविण्याचा प्रयत्न करूं लागलों.

अर्ध्या तासानं इंदूची हाक ऐकूं आली.

“ शिवरामभाऊ, जेवायला चल. ”

तेवढ्यांत बाळ झोंपला होता. त्याला आंथरुणावर ठेवून मी स्वयंपाक-घरांत गेलों. इंदूनं माझ्या एकट्याचंच ताट वाढलं होतं. मीं विचारलं, ‘ गोपाळभटजी नाहीं का जेवणार ? ’

“ ते शांतिपाठाला गेले आहेत. यायला उशीर होईल. तूं जेऊन घे. ” ती माझ्या दृष्टीला दृष्टि देण्याचं टाळून बोलली.

“ इंदू ! आज मी जर माझ्या सख्ख्या बहिणीकडे असतों तर काय केलं असतं ठाऊक आहे ?—”

या माझ्या वाक्यासरशीं तिनं मान वर उचलली.

“ —मीं तिला म्हटलं असतं, तूं कां रडत होतीस तें आधीं सांग. नाहीं तर मी अन्नाला शिवणार नाहीं. पण इंदू, तुला मी तसं सांगूं शकत नाहीं. तुझ्या उपकारांच्या ओझ्याखालीं मीं दबलों आहें. कृतज्ञतेच्या जाणिवेनं

ओशाळा झालों आहें. तूं जेव म्हटलंस कीं मला घांस उचलणं भाग आहे. पण तुझ्या दुःखाचं कारण समजलं नाहीं तोंवर तो माझ्या घशांत अडकून राहील एवढंच तुला सांगतों."

"बैस पाटावर. सगळं कांहीं सांगतें तुला. तुझ्यापासून ती गोष्ट लपवून ठेवतां येणार नाहीं—"

अन् मग तिनं जी हकीगत सांगितली ती मला इतकी अनपेक्षित होती कीं, ऐकतांक्षणींच माझी मान खालीं पडली.

इंदूच्याच गल्लीला दोनतीन घरं सोडून भिकंभट नांवाचा दुसरा एक भिक्षुक राहत होता. त्याची बायको इंदूचा दुस्वास करीत होती. इंदूची लोकप्रियता तिच्या डोळ्यांत सलत असे. तिला थोरामोठ्यांच्या घरचीं आमंत्रणं येतात, लुगडीं-खण मिळतात, हें पाहून तिच्या पोटांत कळ येत असे. गल्लींतल्या बायकांच्या मनांतून ती उतरावी असा तिचा नेहमीं प्रयत्न चाललेला असायचा. मी तिच्या घरीं मुक्काम करून राहिलों आहें हें तिला चांगलं निमित्त मिळालं होतं अन् त्यावर एक कवटाळ रचून तिनें तें गल्ली-भर व्यवस्थित पिकवलं होतं. एका वाक्यांत सांगायचं तर ती महामाया इंदूच्या अन् माझ्या चारित्र्यावर उठली होती.

गल्लींतल्या छिद्रान्वेषी साळकायामाळकायांना चर्चा करायला एक आकर्षक विषय मिळाला होता. आज इंदू जेव्हां शुक्रवारच्या हळदींकुंकवा-साठीं बाहेर गेली होती तेव्हां बायकांनीं माझ्याविषयीं अनेक प्रश्न विचारून तिला छेडलं होतं आणि वर नाकं मुरडलीं होतीं. एका गंगाभागीरथीनं तर रस्त्यांतच तिला उभी करून चमकावलं होतं.

"भटाची बायको अन् हे चाळे का? ठीक नव्हे बरं इंदिराबाई. चांगली कुळाशिळाची म्हणून तुला चातुर्मासांत न्हायला घालण्याचा नेम केला. नरकांत गेलं माझं पुण्य! उद्यांपासून माझ्याकडचं तुझं न्हाणं बंद. मी त्या भिकंभटाच्याच बायकोला बोलावीन. कशी बिचारी सोज्ज्वळ साध्वी आहे—"

हें सगळं प्रकरण मला सांगतांना इंदूचे थांबलेले अश्रू पुनः ओघळूं लागले होते. धर्म करतांना तिचं कर्म उभं राहिलं होतं. पापशंकी जगानं तिच्या बाबतींत सुतानं स्वर्ग गांठला होता. इंदू त्या विषारी वाग्बाणांनीं घायाळ झाली होती. मी तर बसल्या जागीं मृतवत् झालों होतों. हें सगळं माझ्यामुळं झालं ही जहरी जाणीव माझ्या मनाला सुया टोंचीत होती. तिच्या घरीं राहून, तिनं वाढलेलं जेवून मी तिला लोकापवादाच्या वणव्यांत टाकायला कारणीभूत झालों होतों.

"जगाचं एक वेळ जाऊं दे. पण गोपाळभटजींच्या कानावर ही गोष्ट गेली तर–?" मीं सभय उत्कंठेनं विचारलं.

"त्याच दिव्याला आतां मला तोंड द्यायचं आहे शिवरामभाऊ!" असं म्हणून तिनं पदरानं तोंड झांकून घेतलं.

मी सुन्न होऊन तिथून उठलों अन् खोलीकडे जाऊं लागलों. जातांना दाराची ठेंगणी चौकट थाडकन् माझ्या डोक्याला आदळली. एक दीर्घ कळ सण्णादिशीं मस्तकांत भिनली. पण किती सुखावह वाटली ती मला! कितीतरी वेळ मी अंधारांत तोंड लपवून बसलों होतों. पण डोक्याची भणभण कमी होईना. प्रक्षोभ शमेना. वाटलं कीं, सुमाकडे हृदय मोकळं करावं. ही अघटित घटना तिच्या कानावर घालावी.

पण त्या गोष्टीची प्रस्तावना करीत असतांनाच मला कळून आलं कीं, सुमाला तें प्रकरण अज्ञात नव्हतं. भिकंभटाच्या बायकोनं समाचाराच्या निमित्तानं येऊन तिच्याहि कानांत हें विष ओतलं होतं. मी तिच्याकडून या वेळीं सहानुभूतीची अपेक्षा करीत होतों. मला जो वर्मी घाव बसला होता, त्यावर सुमानं हळुवारपणें फुंकर घालावी असं मला वाटत होतं. पण—-

ती रात्र मीं तळमळून काढली. सुमा मात्र स्वस्थ झोंपली. मध्यरात्र उलटून गेल्यावर तिला एकदां जाग आली अन् बाळाच्या अंगावरचं पांघरूण नीट करून ती दुसऱ्या कुशीवर वळली हेंहि मीं पाहिलं. मला वाटलं होतं कीं, 'तुम्हांला अजून झोंप कशी येत नाहीं?' असं ती म्हणेल. पण

तिला माझ्या अंतर्यामीं चाललेल्या घालमेलीची दादहि नव्हती. कधीं न आलेला एक विचार त्या वेळीं माझ्या मनांत येऊन गेला. ‘आपण सगळ्यांच्यासाठीं आहों; आपल्यासाठीं मात्र कोणीहि नाहीं!’

त्या रात्रीं मीं निर्णय ठरवून टाकला तो हा कीं, उद्यांच्या उद्यां कोंकणांत निघून जायचं. उद्यांच्या मावळणाऱ्या सूर्याला मी इंदूच्या घरांत दिसतां कामा नये. तिच्या बाबतींत बीज नसतांनाच हा वड झाला. मी इथें राहिलों तर त्याला पारंब्याहि फुटतील.

सकाळीं उठून मी गोपाळभटजींकडे गेलों. ते घंटा वाजवून देवाची आरती करीत होते. इंदु चुलीशीं चहा गाळीत होती. ‘मी आज कोंकणांत चाललों’ असं भीत भीतच मीं त्यांना सांगितलं. त्यांनीं ‘बरं आहे’ अशा अर्थाची मान हालवली. इंदु विस्मयचकित होऊन माझ्याकडे पाहूं लागली. मी काय, इंदु काय आम्ही तोंडभर बोलणारीं माणसं होतों. पण आज विपरीत परिस्थितीनं आम्हांला मुकं अन् कुढं बनवलं होतं. प्रत्येकानं दुसऱ्याच्या मुद्रेवरचे भाव पाहावे आणि हृद्गत ओळखावं.

मोटारचीं तिकिटं आणण्यासाठीं मी बाहेर पडलों; पण त्या गल्लींतून जातांना आजूबाजूला पाहायचा धीर होईना. मला वाटे कीं, सगळीं माणसं थांबून थबकून माझ्याकडे पाहत आहेत अन् एकमेकांना खुणावीत आहेत—‘तो पहा, इंदूनं घरांत बाळगलेला पाजी माणूस चालला आहे.’

मीं आधीं तिकिटं घेतलीं. नंतर डॉक्टरकडे गेलों. मी कोंकणांत जात असल्याबद्दल त्यांनीं मला मूर्खांत काढलं. पण मीं कांहींतरी बनावट अपरिहार्य कारणं त्यांच्यापुढें उभीं केलीं. त्यांच्याकडून आठ दिवसांचं औषध घेतलं. त्यांचं सगळं बिल चुकतं केलं. त्या कनवाळूपुरुषाला आदरानं एक नमस्कार केला अन् तिथून सटकलों.

येतांना मला बाजारपेठ लागली होती. कापडाच्या दुकानांतून शोकेसमधें लावून ठेवलेलीं कितीतरी छान छान लुगडीं दृष्टीला मोह घालीत होतीं. माझ्या खिशांत पैसेहि होते. पण आज त्यांतलं एखादं लुगडं घेऊन

मी इंदूला देऊं शकत नव्हतों. त्या देणगीनं पेटलेल्या आगींत तेल पडलं असतं अन् त्यांत बिचारी इंदू आणखी होरपळली असती. माझ्या दुर्दैवानं दावा साधला होता. इंदूच्या उपकाराची फेड तर राहिलीच बाजूला; पण नुसती कृतज्ञतासुद्धा तें मला व्यक्त करूं देत नव्हतं. भग्न हृदयानं मी त्या दुकानांपुढून दूर झालों.

दुपारीं तिथून निघतांना इंदू बाहेर आली नाहीं. भरल्या डोळयांना 'येतों' एवढंच तिला सांगून मीं ट्रंक उचलली. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, सुमासुद्धा येतांना तिच्याशीं चार शब्द बोलली नाहीं. मोटार वेळेवर निघाली अन् सुदैवानं वेळेवर पोंचलीहि. त्यामुळें पुढचा चार मैल छकड्याचा प्रवास विशेषसा त्रासदायक झाला नाहीं. करकरीत तिन्हीं सांजेच्या वेळीं मीं घराचं कुलूप उघडलं. सहजच एक सुटकेचा निःश्वास बाहेर पडला. हक्काचं घर ही काय चीज आहे तें मला त्या दिवशीं कळलं. बाहेरच्या जगांत भाजून तापून मी घराच्या छायेला आलों होतों.

देवघरांत जाऊन मीं आधीं दिवा लावला; पण झुरळांनीं त्यांतलं तेल खाऊन टाकलेलं असल्यामुळें तो लवकरच मालवला. ती रात्र माझ्या दृष्टीनें तरी सुखाची गेली. दुसऱ्या दिवशीं सुमाला सडकून ताप भरला. तिसऱ्या दिवशींहि पुन्हा तीच तऱ्हा. तिचीं पावलंहि जाड झालीं होतीं. मीं ओळखलं त्याचं कारण.

त्या दिवशीं घरीं येतांना घाटांत मुसळधार पाऊस कोसळला होता. वाऱ्यानंहि यथेच्छ थैमान घातलं होतं. सुमाला एकदोन वेळां खालीं उतरावं लागलं तेंहि पाऊलभर पाण्यांतूनच. माझ्या एकट्याच्या आधारानं चढतां-उतरतांनाहि तिला खूप त्रास पडला होता.

मी आपल्यापरीनं तिचं सगळं व्यवस्थित करीत होतों. बेळगांवला माणूस पाठवून औषधहि आणवलं होतं. पण आतांशीं माझ्या सेवेंत तिला गोडी वाटेनाशी झाली होती. विशेष म्हणजे बेळगांवांतल्या त्या प्रकरणा-

पासून तिनं माझ्याशीं बोलणंच कमी केलं होतं. एवढ्याशा गोष्टीनंसुद्धा ती चिडे अन् रडे.

मीं तिच्या बापाला बोलावणं पाठवलं. तो आला. चार दिवस राहिलाहि. सुमाचा ताप निघालेला असला कीं तेवढ्या मुदतींत बाप–लेकीचं हितगुज चाले. मला तेवढीच इतर कामासाठीं उसंत मिळे अन् येतां जातां तिचे शब्द कानावर पडत ते ऐकून बरंहि वाटे. लग्न झाल्यापासून मी सुमाच्या सुखांतच स्वतःचं सुख पाहत आलों होतों.

एक दिवस तिचा बाप सकाळीं निघून गेला अन् पुन्हां चार दिवसांनीं परत आला. पण तेवढ्यांत सुमाची प्रकृति अधिकच घसरली होती. तिला मधूनमधून फीट येऊं लागली होती. एक दिवस त्या झटक्यांतून सावध झाल्यावर आपले भारावलेले डोळे माझ्याकडे लावून ती म्हणाली.

" काय होणार माझं ? "

मीं तिला धीर दिला. ' रोग हत्तीच्या पायांनीं येतो अन् मुंगीच्या पावलांनीं जातो ' असंहि सांगितलं. पण हें सर्व वरकरणी होतं. सुमाची आशा मीं पूर्णपणें सोडली होती. ती फक्त दोनचार दिवसांची सोबतीण आहे हें आतां ' देव बोलला होता. ' ' पथ्य पथ्य ' म्हणून आजवर मीं तिच्या जिभेला कांटा लावला होता. पण आतां पथ्याची गरज नव्हती. आतां ती काय मागेल तें द्यायचं, असा मीं विचार केला अन् त्याच क्षणीं बेळगांवांत तिनं मागितलेल्या श्रीखंडाची मला आठवण झाली.

त्याच दिवशीं दुपारीं दोन तीन तास खपून मीं श्रीखंड भरलेली वाटी तिच्यापुढें केली. ती सगळं बळ एकवटून उठून बसली. श्रीखंडाचं पहिलं बोट तोंडाला लावतांच तिची कळी एकदम खुलली.

" किती छान झालं आहे ऽऽ ! "

" आवडलं तुला ? "

तिनं संतोषदर्शक मान हालवली अन् मिटक्या मारीत श्रीखंडाचीं बोटं चाखायला सुरवात केली. जो आनंद सुमाच्या मुखावर पहावा म्हणून मी धडपडत होतों तो आज प्रगट झाला होता. पण त्याच्या दर्शनानं माझ्या पोटांत कालवाकालव झाली. ती प्रसन्नता डोळे भरून पहाण्याची शक्ति आज माझ्यांत नव्हती. मी मागील दारीं गेलों अन् अश्रूंना वाट मोकळी करून दिली.

थोड्या वेळानं परत येऊन पाहातों तों लख्ख केलेली वाटी उशाजवळ होती अन् सुमा कुठेंतरी शून्य दृष्टीनं पाहात होती.

" आणखी हवं ? " मीं विचारलं.

" नको. तृप्त झालें. " तिनं म्हटलं.

मी जेव्हां वाटी घेऊन निघालों तेव्हां ती म्हणाली. ' जरा बसा ना माझ्याजवळ. मला खूप खूप बोलायचं आहे तुमच्याशीं. '

पाळण्यांत बाळानं डोळे उघडले होते. त्याला मांडीवर घेऊन मी शेजारीं बसलों.

" किती सुंदर श्रीखंड केलंत तुम्हीं ! कुठें शिकलांत एवढं सगळं ? मीं तें मागितल्याची आठवणसुद्धा नव्हती मला. पण तुम्हांला आठवण राहिली—आणि त्यावरून मला पुरतं समजलं कीं, मी आतां जगणार नाहीं. तशी आशा असती तर तुम्हीं मला श्रीखंड केव्हांहि दिलं नसतं. शुश्रूषेला जितके मऊ तितकेच पथ्याला काळ आहांत तुम्ही. याचाच अर्थ तुम्हीं माझी आशा सोडली आहे. मीं केव्हांच हें हेरलं होतं. आज तुमचा दुजोरा मिळाला. बरं झालं. सुटेन एकदांची या यातनांतून ! तुम्हींहि मोकळे व्हाल. मला आतां मरणाची भीति वाटत नाहीं. दुःख वाटत नाहीं असं कसं म्हणूं ! एकाच कारणासाठीं तें वाटतं—"

ती थोडा वेळ थांबली. आपल्या कृश मनगटाकडे न्याहाळून पाहातांना

तिनं एक दीर्घ निःश्वास सोडला. डोळयावर आलेले केस मागें सारून ती पुनश्च बोलूं लागली.

" मला बरं वाटावं म्हणून तुम्हीं अनेक ठिकाणीं मला हिंडवलींत. जिथं जावं तिथं आजूबाजूच्या बायकांचे उद्‌गार मला ऐकूं येत. ' बाईनें गेल्या जन्मीं देव चांगला पूजला होता. नवरा किती प्रेमानं चाकरी करीत आहे ! ' तुमच्याही कानावर ते आलेच असतील. पण मीं मात्र तुमच्या विषयीं कृतज्ञतेचा चकारशब्द आजवर काढला नाहीं.

तीन महिने मला न्हाणं नव्हतं. त्यामुळं केसांचं रान झालं होतं. हात घालावा तिथें चिमटींत ऊ सांपडे. डोकं पिकून वेड लागण्याची पाळी आली होती मला. पण एक दिवस तेलाची झारी घेऊन तुम्ही जवळ आलांत. माझ्या जटा पिंजून मोकळया करतांना तुमच्या करंगळयांना फोडसुद्धा आले. त्या रात्रीं किती गाढ झोंप लागली मला ! सकाळीं डोळे उघडतें तों तुमची प्रसन्न मूर्ति समोर उभी ! त्या वेळीं मला वाटलं कीं, आधि-व्याधि हरण करणारा नारायणच माझ्यापुढं प्रगट झाला आहे. पण तरीही मीं तुम्हांला धन्यवाद दिले नाहींत. तुम्हांला वाटलं असेल कीं, ' सुमा किती कृतघ्न आहे ! '

मला बोलांवसं वाटे; पण तें असं दुरून नव्हे. त्यासाठीं मीं बरी झाल्यावर येणाऱ्या एका रम्य रात्रीची कल्पना केली होती. त्या गोड प्रसंगीं मी ते शब्द उच्चारणार होतें. पारण्याच्या दिवशीं पक्वान्न वाढणार होतें. पण—

पण आतां ती आशा नाहीं अन् तेवढी सवडहि नाहीं. जें कांहीं मन मोकळं करायचं तें आत्तां—या क्षणीं करून घेतलं पाहिजे. उपकार मानायच्या आधीं क्षमा मागितली पाहिजे. उपकार फेडण्यासाठीं दुसरा जन्म घेईन; पण क्षमेसाठीं तेवढं थांबतां येणार नाहीं !

पांच वर्षं तुमच्या संगतींत राहून मीं तुम्हांला ओळखलं नाहीं हें माझं अज्ञान; अन् भलत्यावरच विश्वास ठेवला हें पाप. भिकंभटाच्या बायकोनं

त्या दिवशीं भलतंसलतं सांगितल्यापासून माझं मन तुमच्याविषयीं कलुषित झालं होतं, तुम्ही जीव टाकीत असूनहि मी तुमच्याशीं नीट बोलत नव्हतें त्याचं कारण हें. कांहीं दिवस त्याच तिरमिरींत होतें मी. पण मग एक दिवस मन म्हणालं कीं, ' विचार कर. उगाच सुताचं भूत करूं नको. ' अन् मग मी विचार करूं लागलें. तुमची प्रत्येक कृति पारखूं लागलें. शक्याशक्यता लक्षांत आणूं लागलें. आणि त्या छाननींत तुम्ही सोज्ज्वळ होऊन माझ्या मनश्चक्षूंपुढें उभे राहिलांत. एका कथेकरीबुवानं सांगितलेलं माझ्या लक्षांत होतं. ' जो विषयाच्या नादीं लागला तो कर्तव्याला चुकला. ' तीच कसोटी मीं तुम्हांला लावली. इंदूच्या घरीं असतांनासुद्धा तुम्ही क्षणभरहि मला विसंबलां नाहीं. शुश्रूषेसाठीं माझ्या अंगाला स्पर्श करणारा तुमचा हात कधींहि थरथरला नाहीं—माझी मलाच मग लाज वाटली. आम्ही बायका किती मत्सरी असतों, नाहीं !

देवासारखी सेवा घेण्यासाठींच मीं तुमच्या गळ्यांत माळ घातली. तुम्हांला भरपूर राबवून तुमचं मात्र कांहींहि न करतां मी चाललें. पण त्यापूर्वीं एक उपचार माझ्या देवाला समर्पण करायचा अन् मग ही कुडी सोडायची असं मीं ठरवलं आहे. तुम्हीं तो स्वीकारा नि ' सेवा पावली ' असं म्हणा. "

सुमाचं हें बोलणं मला कोड्यासारखं वाटूं लागलं होतं; पण तिनं त्याचा लगेच उलगडा केला. उशीखालच्या चौघडींतून चकचकीत असं कांहींतरी काढून ' हें घ्या ' म्हणून तिनं माझ्या हातावर ठेवलं.

मीं सावकाराकडे गहाण ठेवलेल्या त्या सोन्याच्या चार बांगड्या होत्या. माझं आश्चर्य पराकोटीला गेलं अन् मीं विचारलं, ' तुझ्याकडे कशा आल्या ह्या ? '

" माझ्या दादांनीं दाजी सावकाराचे पैसे देऊन सोडवून आणल्या. "

" त्यांच्याकडे तूं ' भिक्षां देहि ' कशासाठीं केलीस ? "

" तुमच्यासाठीं ! आपल्या घरांतला हा अपूर्वाईचा दागिना. पै-पैसा सांठवून तुम्हीं माझ्यासाठीं हौसेनं केलेला. तुम्हीं तो सावकाराच्या घशांत जाऊं दिला नसतात. त्यासाठीं जिवाचं रान केलं असतंत. उन्हातान्हांत वणवणलां असतां. कर्ज फेडण्याच्या कर्तव्यापायीं बाळाच्या मायेचे पाश ढिले झाले असते. तुमचा चिंतेनं ग्रासलेला चेहरा—बाळाची केविलवाणी मुद्रा—हें चित्र कल्पनेंतसुद्धा मला पाहवेना. मोकळेपणीं बसून दुःख करायलासुद्धा तुम्हांला या कर्जानं सवड दिली नसती. म्हणून मीं दादांच्यापुढें प्रश्न टाकला. शिवाय यांत भिक्षांदेहीचा मुळींच संबंध नाहीं. तुमचं हक्काचं येणं मीं वसूल करून घेतलं आहे. दादा माझ्या लग्नासाठीं दोनशें रुपयांपर्यंत हुंडा देणार होते; पण तुम्हीं कांहीं मागितलं नाहीं म्हणून तेहि गप्पच बसले. मीं त्यांना म्हटलं.

" दादा, मागणाराला जर दोनशें–तर न मागणाराला त्याहून अधिक द्यायला पाहिजे होतं तुम्हीं. पण तुम्हीं त्यांची नुसत्या पुतळीवरच बोळवण केलीत. म्हणून त्यांच्या वतीनं तो हुंडा आज मी मागतें आहें. मुलीच्या लग्नाच्या वेळीं दिला नाहींत तो निदान तिच्या मृत्यूच्या–"

" दादा गहिंवरले. त्यांनीं माझ्या तोंडावर हात ठेवला. चार दिवसांपूर्वी ते आले, ते येतांना बांगड्या सोडवून घेऊनच आले. गेलेलं वैभव माझ्या डोळ्यांदेखत घरांत आलं. आपल्या बाळाच्या नवरीसाठीं तुम्हीं तें जपून ठेवा—"

सुमाचा शब्दन्शब्द मी हृदयाच्या पेटींत सांठवीत होतों अन् हातानं तो चकाकता अलंकार चाळवीत होतों. पण त्या सुवर्णकंकणांच्या लाभापेक्षां माझ्या लाडक्या सुमाचं हृदय शुद्ध झालं याचाच हर्ष मला अधिक झाला होता. तिचे ते जाणिवेचे बोल खडकांतल्या पाझरांसारखे वाटले मला—शीतल, मधुर अन् निर्मळ ! मागं झालेलं अन् पुढें वाढून येणारं सगळं सगळं विसरून मी त्या वेळीं सुखाच्या डोहांत डुंबत होतों. जीवनांतल्या कृतार्थतेचा तो क्षण अष्टौभावें उपभोगीत होतों.

सुमा स्तब्ध झाली होती अन् माझ्या मांडीवर हातपाय नाचवणाऱ्या बाळाकडे स्थिर दृष्टीनं पहात होती. थोड्या वेळानं त्याच्या गालांवरून हात फिरवून ती त्या अजाण अर्भकाला सांगूं लागली.

" लवकर मोठा हो बरं बाळ ! अन् तुझ्या वडिलांना पुष्कळ सुख दे. फुलांत ठेवल्यासारखं त्यांना सांभाळ हं ! तुझ्या आईसाठीं किनई, खूप खूप कष्ट सोसले आहेत त्यांनीं—"

आणि त्यानंतर, बाळाचं मुख कुरवाळणारे तेच दुबळे हात माझ्या गळ्यांत पडले. दोन जीवांची दृढ मिठी बसली. मस्तकाला मस्तक टेकलं. आणि त्याच क्षणीं दोन नि दोन चार अश्रुबिंदू बाळाच्या जावळा-वर ठिपकले !

★ ★ ★

रात्रींची नऊ वाजण्याची वेळ. वास्तविक दिवसभर दमून भागून आलेले कुळवाडी या वेळीं पूर्ण निद्रावश होऊन तो चाळीस-पन्नास झोंपड्यांचा कुळवाड्यांचा वाडा सामसूम व्हायचा.

पण आज तिथें बरीच गडबड दिसत होती.

चंद्रु घाड्याच्या आंगणांत या वेळीं पंधरा वीस कुळवाडी गोळा झाले होते. आंगणाच्या एका बाजूला परसा पेटला होता. त्याच्याकडे पाठ करून आपल्या घोंगड्या खालीं घेऊन ते बसले होते.

त्यांच्यापैकीं दोघांच्या हातांत घुमटें, एकाच्या हातांत समेळाच्या दोन लवलवत्या काठ्या अन् दोघांच्या हातांत झांजा असा वाद्यसमुदाय होता.

एक वृद्धसा कुळवाडी कसलें तरी गाणें हेल काढून उच्च स्वरांत म्हणत होता. बाकीचे त्याला साथ करीत होते. ज्यांच्या हातांत वाद्यें होतीं ते अंगांतून घामाच्या धारा फुटेपर्यंत जोरजोरानें तीं वाजवीत होते. अन् ज्यांना वाजवायला आणि तें विचित्र गाणें म्हणायला येत नव्हतें ते नुसत्या टाळ्या वाजवून मधून मधून डुलक्या घेत होते.

आंगणाच्या मधोमध तुळशीवृंदावन होतें. त्याच्या समोर चंद्रु घाडी बांबूच्या बेळांनीं विणलेल्या चटईवर बसला होता.

त्यानें आपल्या समोर एक लहानसा फळकुटीवजा पाट घेतला होता अन् त्यावर तेहतीस भातगोट्यांची एक पुंजी होती तिच्यांतून कांहीं दाणे

चिमटीनें बाजूला काढून तो मोजीत होता. एकदा मोजायचे, पुन्हा त्यांची पुंजी करावयाची, असें एकसारखें चाललें होतें.

मधेच तो आपल्या भुंवया आकुंचित करी. मधेच तोंडानें कांहीं पुटपुटे. मधेच 'तर देवा सायबा ऽऽ' असें अर्धवटसें वाक्य जोरानें उच्चारी. अन् केव्हां केव्हां भुंग्यासारखा 'गुंऽऽऽ' असा आवाज करीत नागाप्रमाणें डोलूं लागे.

असा थोडा वेळ गेला नाहीं तोंच चंद्रु घाड्याच्या अंगांत अवसर आला. एखादा रागीट बैल शेपटीच्या मुळाशीं हात घालतांच जसा ताडकन् उठून उभा राहतो तसा चंद्रु घाडी एकदम उठला. दोन प्रमत्त अजगर प्रेम-क्रीडा करतांना एकमेकांना जसे विळखे घालतात, तसा तो आपल्या मांड्यांना विळखे देऊं लागला. मधेच तो आंगणाच्या मेरेपर्यंत जाई अन् तिथून मागें फिरे. मधेच जळत्या समईवर आपल्या हाताचा तळवा धरी. मधेच जोरजोरानें घुमूं लागे. तो तसा घुमूं लागला कीं वाजविणारे लोक आपलीं वाद्येंहि द्रुतगतीनें वाजवूं लागत.

या वेळीं चंद्रु घाड्याची मुद्रा एकंदर प्रेक्षणीय होती. त्याचे आधींच इवलेसे डोळे अधिकच आकुंचित झाले होते. भालप्रदेशीं बऱ्याच आंठ्या पडल्या होत्या. त्यानें आपल्या डोक्याला सढळ हातानें तेल चोपडलें होतें, त्याचे ओघळ महिनाभर वाढलेल्या दाढीच्या केसांतून खालीं ओथंबत होते. त्यानें आपल्या शेंडीची लांबच लांब अशी एक भुऱ्या रंगाची जटाच बनवून ठेवली होती. जशी कांहीं काथ्याची पेळूच. तो घुमायला लागला कीं ती सारखी लटलट हालत राही. त्याची छाती एखाद्या खिंडारासारखी मधें खोलगट होती. एका नेसत्या लंगोटीवाचून त्याच्या अंगावर या वेळीं कसलेंच वस्त्र नव्हतें. लंगोटी जरी तेलकट नि मळकट होती तरी ती ज्या रुप्याच्या कांडांत खोचलेली होती, तें कांड मात्र त्याच्या कृष्णवर्ण देहावर चकाकून दिसत होतें.

चंद्रु हा त्या भागांतला एक प्रख्यात देवऋषि होता. लोकांची भूत-पिशाचबाधा निरस्त करणें हा त्याचा लोकोपकारक धंदा होता. कोणाच्याहि घरांत जरा कुठे खटखुट झालें की लोक त्याच्याकडे धावून येत.

ताप आला तरी चंद्रु घाडी, बाळंतीण अडली तरी चंद्रु घाडी अन् एखादा अमिष्ट झाला तरीहि चंद्रु घाडीच. या सगळ्या विकारांचा खुद्द देवाकडून डिप्लोमा मिळविलेला राजवैद्य! तो जे उपाय सांगेल ते करायचे. पुष्कळ लोक–विचारवंतांचे अग्रणी म्हणवणारेसुद्धा–असे त्याच्या भजनीं लागलेले होते.

आज विनोबा हें एक नवें गिऱ्हाईक त्याचा एक फुकटचा अडत्या चंद्रूकडे घेऊन आला होता. अन् त्या गिऱ्हाइकाच्या घरीं कोणतीं भुतें नि देवचार शिरले आहेत तें पहाण्याकरितां आणि तें गिऱ्हाईक कायमचें आपल्या घोंगड्यांत घालण्यासाठीं चंद्रूनें हा अवतार मांडला होता.

सुमारें पंधरा मिनिटें घुमून नि शरीर घुसळून झाल्यावर तो किंचित् स्तब्ध होऊन दीर्घ स्वरांत विनोबाला म्हणाला.

“ बोलरे ऽ ऽ! तुझा प्रश्न बोऽऽल ! सऽऽ– ”

विनोबाला हा देखावा अगदी अपरिचित होता. त्यानें भेदरलेल्या दृष्टीनें एकदा सभोवार पाहिलें.

बाहेर काळा मिट्ट अंधार पसरला होता. रातकिड्यांचा अभद्र आवाज वातावरणांत घुमत होता. आंगणाच्या कडेला तो परसा एखाद्या चिते-सारखा ढणढणत होता. दहा पंधरा कुळवाडी त्याच्या तोंडाकडे नजरा रोखून बसले होते अन् समोर तो आग्या वेताळ–चंद्रु घाडी!

विनोबाच्या तोंडून शब्दच फुटेना. त्यानें त्या अडत्याकडे पाहून ‘ तूंच सांग ’ असें त्याला खुणेनें सुचविलें.

अडत्या त्या शास्त्रांत पारंगतच होता. तो सांगूं लागला.

“ देवा, सायबा ! हा विनोबा देसाई ! पोखरीचा राहणारा. तर देवा माझ्या सायबा, याच्या घरीं गेल्या पंधरा दिवसांत तीन ‘खुनं’ झालीं.

याची चार पांच वर्षांची पोरगी गेली. एक तानपी गाय परवां मिरवेलीच्या डोंगरांत वाघानं खाल्ली. एक पायमोडका बैल कुळागरांत चरायला गेला होता तो ओढ्यांत पडून मेला. अन् आतां देवा, याची बायकोहि बरी नाहीं. पाळीचा ताप येतोय. तेव्हां हें असं कां होतं तें देवा तूंच बघ आतां. हें अजाण लेंकरूं! तुझ्या पायाशीं आलं आहे देवा—"

चंद्रूनें पुनः हुंकार करायला सुरवात केली. आणि थोड्या वेळानें तो बोलला "करणी! करणी—"

सगळे लोक त्या शब्दासरशीं एकमेकांकडे पाहूं लागले. 'पहा कसं बिनचूक ओळखलं' असाच भाव त्या दृष्टींत तरळत होता.

त्या अडत्यानेंहि विनोबाकडे साभिप्राय दृष्टिक्षेप करून स्मित केलें अन् भुवया उडवल्या.

"देवा माझ्या सायबा, या विनोबावर कोणीतरी करणी केली असं तूं म्हणतोस; पण ती कशा प्रकारची आहे?" अडत्याचा प्रश्न.

"बकऱ्याचा बहुमान देऊं करून देवचार याच्या पाठीस लावला आहे." चंद्रूचें उत्तर.

"बरं तर देवा, हो करणी, हा देवचार कोणीं लावला याच्या घरावर? शेजाऱ्यांनीं का वारसांनींऽऽ?"

"वारसांनीं! वारसानं लावला आहे रे! ऽऽ"

आतां आणखी एक विचारतों. "याच्या सख्ख्या भावानं का चुलत भावानीं?"

"सख्ख्या भावानं रे ऽऽ" चंद्रूनें उत्तर दिलें. त्या अडत्यानं एक क्षणभर विचारगंभीर मुद्रा केली अन् तो विनोबाचे सगळे अधिकार आपल्या हातीं घेऊन चंद्रूच्या अंगांतल्या देवाला म्हणाला.

"मग, देवा असं कर. ज्याची करणी त्याच्याकडे लावून दे. विनोबाला त्याची बिलकूल बाधा होतां कामा नये. लाव उलटून जें कांहीं याच्या घरावर घातलं आहे तें सगळं. हातोहात गुण मिळूं दे. आठ दिवसांत विनो-

बाची बायको खडखडीत बरी झाली पाहिजे. त्याचीं गुरं-वासरं, शेत-भात, कश्शाला धक्का लागतां कामा नये. दाखव तुझी देवा प्रचीत! —"

चंद्रूनं समोरच्या पाटावरचे भातगोटे थोडा वेळ फिरवले. थोडा वेळ कांहींतरी पुटपुट केली अन् तीन भातगोटे चिमटींतून उचलून विनोबाच्या पुढें केले.

" देवघरांत नेऊन ठेव. " चंद्रू म्हणाला.

थरथरत्या हातानें विनोबानें तो प्रसाद घेतला नि त्याची पुडी करून खिशांत घातली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं घरीं येतांना विनोबाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. त्याचें विचारचक्र उलटें सुलटें फिरत होतें—

गणोबानं—माझ्या पाठीला पाठ लावून आलेल्या भावानं—माझ्यावर देवचार उठवून लावावा अं? आश्चर्य आहे. गणोबा करील का असं? का चंद्रूघाड्यानं थापा देऊन मला बनवलं? पण तो तरी थापा कां देईल? गणोबा त्याचा शत्रु आहे थोडाच. त्याला जें दिसलं तें त्यानं सांगितलं. चंद्रूचा लौकिक कांहीं असा तसा नाहीं. त्याच्याजवळ कांहींतरी प्रभावी दैवी साधन असल्यावांचून का तो गाजला आहे एवढा या भागांत! कितीतरी माणसं त्याच्या अगदीं घडलेल्या नवलकथा सांगतात त्या काय उगीच! चंद्रू सांगतो तेंच खरं. गणोबानंच माझ्यावर देवचार घातला. माझा उत्कर्ष पहावला नाहीं त्याला.

गणोबा अन् असलं कांहींतरी क्रूर कृत्य—निदान माझ्या बाबतींत तरी करील असं स्वप्नांतसुद्धां आलं नव्हतं माझ्या! पण माणसं वरून दिसतात तशीं आंतून नसतात हेंच खरं!

आपण दोघे किती प्रेमानं अन् ममतेनं वागलों आजवर. अगदीं लहानपणापासूनसुद्धां कधीं आम्ही भांडल्याचं आठवत नाहीं मला. मी सकाळीं गुरं घेऊन माळावर गेलों तर परत येईपर्यंत तो आटवल जेवायचा थांबून राही. आई दोघांच्या दशमीवर लोणी वाढीत असतांना जर चिंचोका-

भर त्याच्या दशमीवर अधिक पडलं तर 'दादा, तुला थोडं पडलं नाहीं का? हें घे' म्हणून तो आपल्यांतलं थोडं बोटानं काढून माझ्या दशमीवर चोळी. वडिलांनीं एक दिवस त्याला मारलं म्हणून त्या रागानं मीं त्यांच्या चष्म्याची काच गुपचूप फोडून ठेवली होती. जांभळीच्या किंवा पेरूच्या झाडावर चढलों कीं पहिलं पक्क फळ खालीं उभ्या असलेल्या गणोबाच्या ओंजळींत पडायचं. मला आठवतं, त्याच्या लग्नाच्या वेळीं विवाहमंडपांत जातांना आई-वडिलांना नमस्कार झाल्यावर इतर मोठ्या नातलगांना सोडून त्यानं तिसरा नमस्कार मला केला होता. त्याचं तें सौहार्द पाहून मीं तर त्या वेळीं मिठीच मारली त्याला. त्याला ठेंच लागली तर माझ्या डोळ्यांतून खळकन् पाणी येई अन् माझ्या डोक्याला सुंठ लागली कीं त्याची मुद्रा कोमेजे.

कुळागारांत एकत्र काम करतांना, शेतांत नांगर धरतांना, शेताच्या मेरेवर बसून एकाच फडक्यांतली नाचण्यांची दशमी हास्यविनोद करीत खातांना आम्हां दोघांना पाहून ऋजु अंतःकरणाचे आमचे कांहीं चाहते एखाद्याला सांगत.

"ही जोडी पाहिलीत का? कलियुगांतले राम-लक्ष्मण आहेत हे!"

वडील वारल्यानंतर पांच वर्षांनीं आम्हीं विभक्त व्हायचं ठरवलं. एकमेकांच्या विचारानंच इस्टेटीच्या वांटण्या केल्या. या कामीं कोणाहि तिऱ्हाइताची गरज लागली नाहीं आम्हाला. धाकटा भाऊ म्हणून जमिनीचा त्यांतल्या त्यांत सरस असलेला तुकडा मीं आपण होऊन गणोबाला दिला. रोख रकमेच्या समप्रमाणांत वांटण्या करूनहि त्याला घरासाठीं म्हणून मीं दोनशें रुपये माझ्यांतले उचलून दिले. वडिलांच्या पश्चात् पांच वर्षं सगळा संसार अन् देवघेव माझ्याच हातांत होती. दादागिरीच करायची असती तर भावाला नकळत तीन-चारशें रुपये मी सहज गिळंकृत करूं शकलों असतों: तशीं उदाहरणं आमच्या गावांत किती तरी होतीं. पण मी तसल्या मोहाला बळी पडलों नाहीं. त्यांतलेच कांहीं दादा लोक प्रच्छन्न अन् उघडपणें-

सुद्धा मला तसला कल्याणाचा मार्ग उपदेशीत होते. पण मी त्यांच्या वाऱ्यालासुद्धा उभा राहिलों नाहीं.

सगळया वांटण्या होऊन विभक्त होतांना गणोबाला गहिंवर आला तो किती अनावर!

"दादा!......खरोखर धर्मराज आहेस रे तूं......तूं सांगतोस म्हणून वेगळा होतों ... पण ... यापुढंहि अशीच मायेची पाखर ठेवशील का माझ्यावर?...मला सोडणार नाहींस ना?......" तो मला घट्ट मिठी मारून स्फुंदूं लागला.

जेव्हां हृदयांत भावनांचा पूर लोटतो तेव्हां वाणी त्या महापुरांत बुडून जाते—गडप होते. माझंहि तसंच झालं. त्याच्या खांद्यावर थोपटतां थोपटतां कसेबसे एवढेच शब्द माझ्या तोंडून बाहेर पडले. 'वेडा कुठला—'

माझ्या घराशेजारींच गणोबानं आपलं नवं टुमदार घर बांधलं अन् तो तिकडे रहायला गेला.

बाह्यात्कारीं विभक्त होऊनहि आम्ही अंतर्यामीं एकजीव राहिलों. आमची माया—ममता लवभरहि कमी झाली नाहीं.

माझ्या घरीं एखादा पाहुणा अवेळीं आला तर त्याच्या घरांतलं दूध-दहीं अन् एखादं तोंडीलावणं न सांगतां गुपचूप मागच्या दारानं आमच्या चुलीशीं यायचं. अन् त्याच्या घरीं कांहीं उणं आगळं पडलं तर आमच्या घरून भरून निघायचं.

विचार करतां करतां विनोबाला आपलं नि भावाचं एकंदर पूर्वचरित्र आठवलं. त्या पूर्वचरित्रांत भावमधुरता होती, स्निग्धता होती अन् हृदय-सुमनांचा सुगंध होता. पण आतां—

ज्या विनोबाच्या अंतरांत गणोबाविषयींच्या वात्सल्याची गंगा झुळझुळत होती, त्याच गणोबाविषयीं आतां विनोबाला तिरस्कार वाटूं लागला होता.

"गण्या, तूं इतका उलट्या काळजाचा आहेस असं मला आधीं कळून आलं असतं तर—!"

" इतर कसलंहि माझं नुकसान केलं असतंस तरी तुला मीं उदार अंत-: करणानं क्षमा केली असती. पण—माझ्यावर करणी केलीस, माझी सोन्या-सारखी मुलगी दोन दिवसांच्या तापानं तडकाफडकीं मेली......माझ्या काळजाचा केवढा लचका तोडलास तूं!!"

" आतां तुला क्षमा नाहीं. तुझा अन् माझा बंधुभावाचा संबंध तुटला आज... आतां तूं आहेस न् मी आहें...!"

अशा प्रक्षुब्ध विचारांच्या वातचक्रांत गिरक्या खात खात विनोबा घरीं येऊन पोंचला.

गणोबाला चांगलें खडसावून काढायचें असा त्याचा बेत होता. पण गणोबा समोर येऊन उभा राहिला तरी त्याची जीभच हालेना.

आजवर भावाविषयीं कधींहि न उच्चारलेला क्रोधोद्गार एकाएकीं बाहेर पडणें ही गोष्ट खरोखर तितकीच कठीण होती.

" दादा, काल रात्रीं कुठं गेला होतास तूं? जातांना सांगून नाहीं गेलास?" गणोबानें सहज विचारलें.

' गेलों होतों तुझं कर्म निस्तरायला ' असे शब्द त्याच्या जिभेवर आले होते. पण बाहेर पडले ते मात्र वेगळेच.

" असाच कुठं तरी " असं बोलून विनोबा त्रस्त मुद्रेनें आंत गेला.

गणोबाला पहिला आश्चर्याचा धक्का बसला तो त्या वेळीं!

विनोबानें आंत जाऊन आपल्या पत्नीला चंद्रु घाड्यानें सांगितलेली गोष्ट निवेदन केली. अन् विनोबाला जें बोलतां आलें नाहीं तें त्याची सौभाग्यवती साग्रसंगीत बोलली.

दुपारीं कडाक्याचें भांडण झालें त्या दोघी जावांचें.

गणोबा हतबुद्ध होऊन पडवींत बसला होता.

संध्याकाळीं विनोबा शेतावरून आला तेव्हां गणोबानें त्याच्या घरीं येऊन अजीजीच्या स्वरांत म्हटलें.

" दादा, कसला भयंकर आरोप करतोस हा माझ्यावर ! मी तुझ्या बरावर देवचार घालीन होय ? देवचार कशाशीं खातात तेंसुद्धा मला ठाऊक नाहीं—"

" तुला नसेल ठाऊक. पण तुझ्या घाड्याला आहे ना ? "

" भ्रम आहे तुझा हा ! "

" आतां नाहीं. इतके दिवस होता. तुला मी सज्जन समजत होतों, आपला समजत होतों. "

" अन् आतां ! "

" आतां......माझ्याशीं बोलूं नकोस यापुढं तूं. तुझा भाऊ होता तो मेला म्हणून समज. अन् मीहि..."

पण त्याच शब्दाच्या वेळीं विनोबाची जीभ अडखळली.

दोघे दोन बाजूला झाले अन् त्याच क्षणीं त्या कुटुंबांत द्वेषाचें विषबीज रुजलें. दुजेपणाची एक दुर्लंघ्य दरी त्या दोघांमध्यें निर्माण झाली.

दोघेहि एकमेकांची पायरी चढेनात त्या दिवसापासून.

दोघांनींहि एकमेकांशीं संभाषण बंद केलें.

त्यानंतर त्या दोघांची प्रत्यक्ष तोंडातोंडी कधींच झाली नाहीं. फारच झालें तर विनोबा आपल्या पडवीवर नि गणोबा आपल्या ओसरीत आपल्याशींच वैतागत.

रस्त्यांत दोघांची गांठ पडलीच तर विनोबा दक्षिणेचीं झाडें मोजूं लागे अन् गणोबा उत्तरेला ध्रुवाचा तारा क्षितिजापासून किती अंशावर आहे त्याचें निरीक्षण करी.

अन् हें विपरीत दृश्य पाहिल्यावर जाणारे येणारे आपसांत कुजबुजत.

" कालचे राम–लक्ष्मण तेच आजचे भीम–दुःशासन बरं का ! "

गणोबा हल्लीं उदास असे. भांडण झाल्या दिवसापासून त्याची वृत्ति कुढी बनत चालली. शेजाऱ्या–पाजाऱ्यांतहि तो मिसळेनासा झाला.

चार लोक एकत्र झाले कीं त्यांचा प्रमुख चर्चेचा विषय म्हणजे विनोबा अन् गणोबा.

घरचें खाऊन लष्करच्या भाकऱ्या भाजणारे लोक खेडेगांवांतूनच फार असतात. आग विझविण्यापेक्षां तिच्यांत तेल ओतण्याकडेच अशा लोकांची प्रवृत्ति फार.

अन् हेंच गणोबाला आवडत नसे.

विनोबा मात्र शेजारीं जाऊन गणोबाची निंदा करी अन् म्हणे, ' इतकं केलं भावाचं पण त्यानं मात्र माझ्या डोक्यावर मिऱ्यें वाटलीं. '

अन् त्यावर गांवांतला कुटाळकंपू उत्तर करी.

" अहो, आम्हांला हें स्वप्न आधींच पडलं होतं. पण म्हटलं आपण कशाला बोला ! किती झालं तरी तुम्ही सख्खे भाऊ ! रक्ताला रक्त मिळायचंच अन् मधें बोलणारा आमच्यासारखा मात्र वाईट ठरायचा. विनोबा, तुम्ही भोळे बरं ! अगदीं सांबाचे अवतार. गोगलगाईला पोटांत पाय असतात हें तुम्हांला कसं कळायचं ! "

विनोबा असल्या बोलण्यावर अगदीं खुष होई.

चंद्रु घाड्याकडे जाऊन देवपण पाहाण्याचा त्याचा नाद वाढतच होता. जरा कुठें दुखलें खुपलें कीं तो सगळें सोडून चंद्रूकडे धाव घेई. चंद्रु त्याचा प्रतिपरमेश्वर बनला होता.

" जा तुम्ही घरीं ! तुमचा एक केससुद्धा वांकडा होऊं देणार नाहीं मी ! कावळा उडणार नाहीं तुमच्या घरावरून— ! " असल्या वल्गनांनीं चंद्रू त्याला दमदार करून परत घरीं पाठवी.

अशा स्थितींत सहा महिने लोटले. दोघे भाऊ अंतस्थ एकमेकांचा द्वेष करीत. एकमेकांवर जळत. त्यांच्या बायका तर इतक्या भांडत कीं त्यांना आवरणें नवऱ्यांनासुद्धा अशक्य होत असे.

" अग, किती भांडशील ? पुरे आतां. " असं विनोबा म्हणाला कीं त्याची बायको फणफणून उत्तर करी.

" इतका भावाचा पुळका आला असला तर बसा त्याला मिठी मारून............!"

गणोबाकडचें वासरूं विनोबाच्या आंगणांत आलेलें खपत नसे. अन् विनोबाकडचें मांजर गणोबाकडे गेलें तर दुधाच्या फडताळाकडे न जातांहि त्याला चपराक मिळे.

अपवाद होता तो फक्त एकच. गणोबाचा मुलगा बाळ.

तो सहा सात वर्षांचा लाघवी मुलगा मात्र विनोबाकडे येऊन काकांच्या ताटांत जेवल्यावांचून, काकांच्या दशमींतला चतकोर उपटल्यावांचून अन् त्यांच्या मांडीवर बसून एखादी चिमणी कावळयाची गोष्ट ऐकल्यावांचून एक दिवसहि कधीं राहिला नाहीं.

विनोबाकडे जाण्याची खोड सुटत नाहीं म्हणून आईनें त्याला कितीदा तरी निर्दयपणें बदडलें होतें. पण तो मुलगा त्या बाबतींत पुरा कोडगा बनला होता. तो लबाड छोकरा हातोहात आईला फसवून विनोबाकडे येई. अन् परत जातांना काकांना म्हणे.

" काका, मी तुमच्याकडे आलों होतों म्हणून आईला सांगूं नका हं."

विनोबालाहि त्या मुलाचा अतिशय लळा होता. तो घटकाभर दिसला नाहीं तर त्याला बेचैन होई. पूर्वी तो वेळोवेळीं हाका मारून त्याला बोलावून घेई. पण आतां ती सोय नव्हती. तो पडवीवर बसला कीं 'आतां बाळ येईल का?' अशी कल्पना करीत त्याला त्याची वाट पहात बसावें लागे. त्या दोन कुटुंबांत एवढा वैराग्नि धुसमत होता तरी विनोबानें त्याची झळ बाळाला मुळींच लागू दिली नाहीं.

विनोबाची त्याच्याच वयाची मुलगी गेल्यापासून बाळच त्याच्या जिवाचा विरंगुळा होऊन राहिला होता.

'आईबरोबर तूं भांडूं नको; म्हणजे मी तुमच्याकडे आलों तर आई मला मारणार नाहीं' असें तो काकुला बजावी अन् काकांना आपल्या घरीं चलण्याबद्दल वेळोवेळ आग्रह करी.

पण ‘ बालादपि सुभाषितं ग्राह्यम् ’ ही म्हण पुष्कळ वेळेला भिंतीवरच्या चौकटींतच रहाते.

कालचक्रानें बारा महिन्यांचा एक फेरा पूर्ण केला, तरी त्या दोन कुटुंबांतला वैराग्नि शमला नाहीं.

आणि त्यानंतर असा एक दिवस उजाडला कीं, त्या दिवशीं बाळ विनोबाकडे आला नाहीं. दुसऱ्या दिवशींहि तसेंच. फिरून तिसऱ्या दिवशींहि तेंच.

विनोबा अगदीं बेचैन झाला त्यामुळें. बारकाईनें तपास करतां त्याल कळलें कीं बाळ आज तीन दिवस तापानें आजारी आहे अन् अजून त्याचा ताप निघाला नाहीं.

विनोबाचें सात्त्विक मन म्हणूं लागलें. ‘ आपण जावं बाळाकडे. त्याच्याशीं बसावं. त्याला जवळ घ्यावा. परसांतल्या झाडाचं एक साखरलिंबू तोडून त्याची एक फोड बाळाच्या सुकून आलेल्या तोंडांत घालावी. अन् त्याच्या अंगावरून हात फिरवून त्याला मृदु शब्दांत म्हणावं ‘ बाळ, ताप आला तुला ? निघेल हो माझ्या राजाचा ताप ! ’

विनोबाला असें वाटलें खरें; पण त्याचे पाय कोणत्या तरी निर्घृण विचारांनीं ओढून धरले. घरांतल्या घरांतच तो चुळबूळ करीत राहिला. गणोबाच्या घरीं पाऊल टाकणं म्हणजे आपल्या मानीपणाचा तो उपमर्द आहे, गणोबाला ती शरणचिठ्ठी आहे, असें वाटलें त्याला. असेल थंडी-वाऱ्याचा ताप. निघेल एक-दोन दिवसांत. असें त्यानें आपल्या मनाचें लंगड समाधान करून घेतलें.

पण तें समाधान त्याला फार वेळ लाभूं शकलें नाहीं.

बाळाच्या तापाला त्या दिवशीं सातवा दिवस होता.

संध्याकाळीं सहाचा सुमार असेल. गणोबाच्या घरीं एकाएकीं रडारड झाली.

विनोबाचें काळीज धडधडलें. सगळे विचार–विकार मागें हटवून 'बाळाचें काय झालें असेल तें पाहून यावें' ही एकच भावना विनोबाच्या अंतरांत प्रबल झाली.

चालत नव्हे–धावतच तो गणोबाच्या घरांत गेला. बाळाला भ्रम होऊन तो डोळे फिरवीत होता. अन् त्याचे आईबाप जवळ बसून हुंदके देत होते. शेजारच्या कांहीं बायका त्याच्या डोक्यावर कांद्याचा कवळ घालीत होत्या.

'होईल ना हो माझा बाळ बरा ?' असें त्याची आई जवळच्या माणसांना विचारी. तो तिचा करुणाक्रंदित प्रश्न कोणाच्याहि हृदयाला घरें पाडील इतका भेदक होता.

अवघ्या सात दिवसांत काय दशा झाली होती त्या अर्भकाची ! 'मला ओळखलंस का ! मी कोण ?' असें परोपरीनें विनोबानें त्याला विचारून पाहिलें. पण—

जीवन अन् मृत्यु यांच्या सीमारेषेवर होता तो या वेळीं !

विनोबाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

"दादा, आतां कशाला रडतोस ? याला कारण तूं. माझ्या पोराची अशी दशा तूं केलीस. उठल्या बसल्या घाड्याकडे जाऊन, देवा–देवचारांना गाऱ्हाणीं बोलणीं करून, कोंबड्यांच्या पिलांचे बळी देऊन आपल्या घरचा वास्तु बिघडवून टाकलास. आमच्या वाडवडिलांनीं कधींहि न केलेल्या असल्या राक्षसी कृत्यांचा तुलाच कुठून हा नाद लागला ? काय मिळवणार तूं अशानं ? तुला कुठलं इंद्रपद कधीं मिळेल तें मिळो; पण आज या घटकेला आमच्यावर मात्र असला प्रसंग गुदरला ! माझा बाळ—"

असें म्हणून गणोबा मोठ्यानें रडूं लागला. प्रत्येक हुंदक्याबरोबर त्याचें शरीर गदगदां हालत होतें.

गणोबाचे ते शब्द विनोबाच्या मस्तकावर सोट्यासारखे आदळले.

विनोबा ताडकन् तिथून उठला अन् त्यानें चंद्रु घाड्याच्या गांवचा रस्ता सुधारला.

रात्रीं आठ वाजायच्या सुमाराला त्यानें चंद्रूचें घर गांठलें. चंद्रू नुकताच जेवून पानसुपारीचा बटवा सोडून परशाजवळ बसला होता.

" चंद्रू, माझा पुतण्या अत्यवस्थ आजारी आहे. विषमज्वर. आजचा सातवा दिवस. ताबडतोब त्याचा ताप निघेल असा उपाय कर. तुझ्या घाडीपणाची या वेळीं सत्त्वपरीक्षा आहे ! " विनोबा अगदीं गळ्यांत जीव आणून म्हणाला.

" विनोबा, हें काय भलतंच सांगतां तुम्हीं ! शुद्धीवर आहांत ना ? अहो, गणोबानं तुमच्यावर केलेली करणी मीं त्याच्यावर उलटून लावली नाहीं का ? तीच त्याला आतां भोंवते आहे. अजून काय झालं आहे ? ही कुठं सुरवात आहे नुकती. दशादुर्दशा उडेल त्याची ! आहांत कुठें तुम्हीं ! हा चंद्रु घाडी आहे म्हणावं— "

विनोबाचें सर्वांग शहारून गेलें त्या भयानक शब्दांनीं.

" तें कांहीं नाहीं. असलं भलतं सलतं बोलूं नको, तो मुलगा बरा झालाच पाहिजे. चल आटप. घे तुझा तो पाट अन् भातगोटे. तुझ्या देवचाराला काय हवा तो नवस बोल या वेळीं ! "

विनोबाचें प्रकरण बरेंच हातघाईवर आल्याचें चंद्रु घाडी समजला. या वेळीं आपण अपेशी ठरलों तर हें कुळ आपल्या हातचें जाणार हें त्या धूर्त घाड्याच्या ध्यानांत यायला उशीर लागला नाहीं. या वेळीं विनोबाला नुसती भीति घालून वेळ मारून न्यावी असें त्यानें मनाशीं ठरवलें.

" विनोबा, तो देवचार महाप्रखर आहे बरं. आतां तुम्ही त्याच्या वाटेला गेलांत कीं तो तुमच्यावर उलटेल ! "

" चालेल, काय वाटेल तें होऊं दे पुढें. पण आज बाळाला जगूं दे ! "

" देवचार फार खवळला आहे. मला आवरणार नाहीं तो आतां. "

" तें कांहीं नाहीं चालायचं. देवचार आवरलाच पाहिजे. नाहींतर घाडी कसला तूं ? "

चंद्रूच्या शेपटीवर पाय पडला या शब्दांनीं !

" उद्यां सकाळीं या. मग पाहूं. " तो गुरगुरला.

" उद्यां नाहीं आत्तां ! "

" शक्य नाहीं. "

" आग लाव तुझ्या त्या घाडीपणाला ! "

रागानें तणतणत विनोबा आला तसा मागें परतला. फिरून गणोबाच्या घरीं यायला त्याला रात्रीचे अकरा साडेअकरा झाले.

" कसं आहे बाळ्याचं ?– " त्यानें गणोबाला भीतभीत विचारलें.

" ताप निघाला. चांगला घाम येऊन निघाला. "

" ईश्वराची कृपा ! " विनोबानें शिरावरचें ओझें उतरल्यागत दीर्घ निःश्वास टाकला.

" बाळ, कसं वाटतं तुला ? " विनोबानें बाळाच्याजवळ बसून विचारलं.

" काका, तुम्ही...तुम्ही आलांत आमच्याकडे ? "

" हो बाळ. "

" आतां रोज याल ? "

" येईन बरं ! "

" आण्णांशीं बोलाल ? "

" हो, बोलेन. " .

" खरं ? अगदीं ? देवाशप्पत ? "

" अगदीं देवाशप्पत ! "

" काका......काका.........तुम्ही कित्ती चांगले आहांत... "

त्या अजाण अर्भकाचें तें अश्रुमिश्रित हास्य पाहून सर्वांचें हृदय गदगदां हाललें.

विनोबानें एका हातानें डोळ्यांना पंचा लावला अन् दुसऱ्या हातानें त्या ज्वरजर्जर बालकाला आपल्या मांडीवर ओढलें.

थोड्याच वेळांत बाळाचा डोळा लागला. पांच मिनिटेंपर्यंत तिथलें वातावरण अगदीं निःशब्द होतें.

" दादा ! " गणोबानें हांक मारली.

" अजूनहि तुला वाटतं का, मीं तुझ्यावर करणी केली आहे असं ? दादा, खरोखरच नाहीं रे ! पहा एकदा माझ्याकडे नीट अन् सांग. तूं माझा भाऊ आहेस. वडिलांसारखा मानला आहे मीं तुला. तूंच मला माझा हात धरून या पदावर आणून बसवलंस. अन् मी तुझ्यावर करणी करीन ? इतका का मी कृतघ्न आहें ? " गणोबाचे डोळे भरून आले होते अन् प्रत्येक वाक्याला त्याचा कंठ अधिकाधिक सद्‌गद होत होता.

विनोबाला उत्तर देववेना. इतका तोहि बाष्परुद्ध झाला होता. त्यानें फक्त मान हालवून ' नाहीं, तूं कृतघ्न नाहींस बरं ' असा भाव व्यक्त केला.

" तुलाहि मी दोष देत नाहीं दादा. हातातोंडाशीं आलेली तुझी मुलगी एकाएकीं काळानं झडप घालून नेली. अन् त्यामुळंच तुझं धीरगंभीर मन कमकुवत झालं, हें मला कळतं. नाहींतर तूं असल्या घाडी–भगतांच्या नादाला लागला नसतास. दादा, सुमन तुझी मुलगी खरी ; पण मला तिच्या मृत्यूचं दुःख कांहींच नाहीं असं का तुला वाटतं ? सुमन अन् बाळ. दोघांच्या खेळांना अन् बाललीलांना आपलं घर अन् विस्तीर्ण आंगण अपुरं पडत होतं. ती गेली अन् बाळहि आज त्याच वाटेवर होता. पण देवाची कृपा कांहींतरी होती म्हणून बचावला. दादा बाळासाठीं तरी तूं आमच्यावरचा राग सोड. तूं माझ्याशीं बोलत नाहींस, आमच्याकडे येत नाहींस म्हणून बाळ किती कष्टी होतो ! गेल्या दिवसांतली गोष्ट. गणपतीच्या समाराधनेला पुष्कळ माणसं जमलीं होतीं माझ्याकडे. बाळानं तुला परोपरीनं बोलावलं. तूं आला नाहींस. अन् त्या दिवशीं बाळ पानावर वाढलेल्या मोदकाला शिवलासुद्धा नाहीं. इतकी कठोरता कां अन् कुठून आली तुला ? "

" गेलं सबंध वर्षभर किती असह्य अन् मुक्या यातना मीं सोसल्या त्याची तुला काय कल्पना ! जन्मापासून आपल्या प्रेमांत कधीं अंतर

पडलं नाहीं. आणि आज मात्र दोघांचीं तोंडं दोन दिशांना. अन् तेंहि निष्कारण ! चारचौघांत तोंड दाखवायला लाज वाटूं लागली मला–" गणोबाला पुढें बोलवेना. त्यानें पाठीमागें असलेल्या वळकटीवर डोकें टेकलें.

"गणू !......खरं आहे तूं बोललास तें ! चुकत होतों मी. त्या घाड्यानं बनवलं मला. आज मला किती बरं वाटतं आहे ! केवढा कौटुंबिक सुखा-समाधानाचा–आनंदाचा–ठेवा इतके दिवस दूर लाथाडला मीं. गणू, मी बदललों. पण तूं बदलला नाहींस. तूं पूर्वीचाच माझा गणू आहेस......मी अधम......मूर्ख......अविवेकी बनलों......मला क्षमा......!"

गणोबानें चटकन् उठून विनोबाच्या तोंडावर हात ठेवला.

"दादा, क्षमायाचनेचा अधिकार माझा."

इतक्यांत बाळानें झोपेंतून डोळे उघडले. अन् क्षीण स्वरांत तो बोलला.

"काका, मला तुमच्या कुशींत घ्या ना !"



## ३ : : धन आणि मन

थोडथोडके नव्हेत तर एक हजार रुपये, जनुभाऊ जोगळेकर माझें देणें लागत होते. आजवरच्या आयुष्यांत ऋणको किंवा धनको म्हणून मी कोणाची पायरी चढलों नव्हतों. पण माझ्या निपुत्रिक सासऱ्यानं मरायच्या आधीं एक घटका, जनुभाऊंकडे कर्जाऊ असलेले हजार रुपये माझ्या नांवें करून मला सावकार बनवलं होतं.

माझ्या गांवांत दोघे सावकार रहात होते. लोक त्यांच्याविषयीं नाना प्रकारच्या गोष्टी बोलत. गांवकीच्या संबंधांत ते-आम्ही बऱ्याच वेळां एकत्र येत असलों तरी मी नेहमीं त्यांच्यापासून चार पावलं दूरच रहात असें. मला त्यांच्या गोष्टींत रस वाटत नसे. पण त्या हजार रुपयांची मालकी माझ्याकडे आल्यापासून मला कांहीं तरी निराळंच वाटूं लागलं होतं. चार-चौघे भाविक श्रोते जमवून ते जेव्हां सांगूं लागत कीं, 'अमकं कुळ नाठाळ आहे, तमका शिरजोरी करतो, अमक्या एकाला मी असा इंगा दाखवला' तेव्हां मीसुद्धा त्यांच्या सुरांत सूर मिसळून म्हणूं लागलों होतों.

"सगळीकडे एकच तऱ्हा. आमच्या पण एका कुळानं गेल्या दोन वर्षांत व्याजाची एक पैसुद्धां दिली नाहीं."

आणि ही गोष्ट खरी होती. जनुभाऊंनीं गेलीं दोन वर्षं मला तोंडसुद्धा दाखवलं नव्हतं. पण खरं सांगायचं म्हणजे मीं ती गोष्ट विशेषशी मनावरहि घेतली नव्हती. त्या पैशांचा लोभ अजून मला जडावा तितका जडला

नव्हता. माझा मुलगा श्रीधर मात्र त्या बाबतींत उदासीन नसे. जनुभाऊंचं नांव निघालं कीं तो अस्वस्थ होत असे. किंबहुना तोच ती गोष्ट वारंवार उकरून काढीत असे, असं म्हटलं तरी चालेल.

श्रीधरच्या अंगांत नुकताच कर्तेपणा येऊं लागला होता. पण विचार अजून कडक होते. बुद्धीची धार बोथट होऊन तिला अजून व्यावहारिकपणा आला नव्हता. आपल्या हक्काचं असेल तें बिनतक्रार आपल्याला मिळावं असं त्याला वाटे. त्यांत कोणीं अडथळा आणला कीं त्याचं रक्त तापत असे. त्यामुळेंच जनुभाऊंच्याबद्दल तो पुष्कळ वेळां वेडंवाकडं बोले. मला तें न आवडून मीं एक दिवस त्याला म्हटलं.

" असं काय बरळतोस वेड्यासारखा ? दोन वर्षांचं व्याज दिलं नाहीं, म्हणून तूं त्याला लबाड ठरवूं नकोस. संसारांतल्या अडचणींची अजून तुला कल्पना नाहीं. उत्पन्न असूनहि माणूस कित्येक वेळां तांबड्या पैशाला महाग होतो. बाबा रे, कर्ज कोणी सुखानं ठेवीत नाहीं. कर्जाचं ओझं नुसतं जडच नव्हे तर टोचणारंहि असतं. निरुपाय म्हणून माणूस तें शिरावर वागवतो. जनुभाऊंची अशीच कांहीं तरी ओढाताण झाली असली पाहिजे. नाहीं तर त्यांनीं आपले पैसे ठेवले नसते. तो भला माणूस आहे असं मी ऐकतों. लोक त्याची दानत वाखाणतात. "

" तुम्हांला सगळेच धर्मराजाचे अवतार वाटतात. तुम्ही आपल्यावरून जगाची पारख करतां. तुम्हांला लोक लुबाडतात ते यामुळेंच. यानं पांच, त्यानं दहा, असे वाड्यावरच्या कुळवाड्यांनीं तुमचे किती रुपये बुडवले असतील याचा कधीं हिशेब काढला आहे का तुम्हीं— ? "

" नाहीं काढला—कारण मीं ते पैसे कर्जाऊ दिलेलेच नव्हते. ती माझी सावकारी नव्हती. ऐन मध्यरात्रींसुद्धा माझ्या हांकेला 'ओ' देणाऱ्या गरीब कुळवाड्यांना, त्यांच्या कठिण प्रसंगीं केलेली ती अल्पस्वल्प परतफेड होती. ते परत देण्याच्या उद्देशानें पैसे मागत होते. मी ते परत येणार नाहींत या खात्रीनं देत होतों. संसारांतला जमाखर्च मी एका निराळ्या

पद्धतीनं मांडतों. त्याचं रहस्य तुला कळायचं नाहीं. तूं थोडासा आजोबांच्या वळणावर गेला आहेस. ”

श्रीधर त्यावर कांहीं बोलला नाहीं. कसल्या तरी कामाचं निमित्त करून तो माझ्यापुढून निघून गेला.

ते पैसे वसूल करण्यासाठीं तो धडपडूं लागला. त्याची आई त्याला या कामीं उत्तेजन देत होती. कारण ते पैसे तिच्या बापाचे होते. त्यानं जनूभाऊंना प्रथम निरोप पाठविले. नंतर पत्रं धाडलीं. विनवणी, सामोपचार, खडसावणी अन् शेवटीं कायद्याची धमकी अशी त्या पत्रांतील मजकुराची चढती भांजणी होती. पण जनूभाऊंना एकहि मात्रा लागू पडली नाहीं, असा त्याला अनुभव आला.

शेवटीं तो जातीनें तिथें जाऊन आला. त्याच्या मुद्रेवरूनच मीं ताडलं, कीं तो हात हालवीत परत आला आहे. पण जिज्ञासा स्वस्थ बसूं देईना म्हणून मीं त्याला विचारलं.

“ काय रे, भेटले का जनूभाऊ ? ”

“ तो कसला भेटतोय ? मला पाहून लपला असेल कुठें तरी. त्याचे थोरले चिरंजीव भेटले. अजब वल्ली आहे ती ! मीं व्याजाचा विषय काढतांच तो हसायलाच लागला. मीं म्हटलं, ‘ हसतां काय असे ? ’ तर मला सांगतो—

“ हसूं नको तर काय करूं ? अहो, रक्कम ती केवढी, तिचं व्याज तें किती अन् तुम्हीं त्याच्यासाठीं एवढा हेलपाटा घेतलांत तो काय ? काळीज घट्ट ठेवा बरं ! तुमचे पैसे अगदीं तुमच्या पेटीच्या आंतल्या कप्प्यांत आहेत असं समजा. गुदामांत पन्नास खंडी काजू खरेदी करून ठेवलेल्या आहेत. थोडा भाव वाढतो का वाट पहातों. कालच पणजीला जाऊन आलो. तिथला भिकारदास शेट ऐकून माहीत आहे ना ? केवढी पेढी आहे त्याची ! लाखों रुपयांचा व्यापार करतो. माझा अगदीं जानी दोस्त. मला म्हणाला कीं सखारामशेठ, पंधरा दिवसांत काजूंचा भाव तेजींत येणार आहे.

एवढ्यांत माल काढूं नका ... जाऊं द्या. तुम्हांला नाहीं कळायच्या या व्यापारांतल्या गोष्टी. तुम्ही पै अन् पैसा यांची गांठ घालीत बसणार अन् दोन दिवस कोणाकडे चार पैसे थकले—"

"अहो महाराज! दोन दिवस नाहींत, दोन वर्षं झालीं या गोष्टीला. माझे आजोबा वारल्यापासून तुम्हीं एक छदाम दाखवला नाहीं आम्हांला." मी मध्येंच म्हणालों.

"कसल्या क्षुल्लक गोष्टी घेऊन बसलांत श्रीधरपंत! आमच्याजवळ पैसे नाहींत म्हणून का तुमचं कर्ज ठेवलं आहे आम्हीं? शंभराशंभराच्या दहा नोटा फेकल्या कीं खलास. मग तुम्ही कोण अन् आम्ही कोण! पण म्हटलं, तुम्हांला चार पैसे व्याजाचे मिळतात तर मिळूं द्या. तेवढ्यानं काय होणार आहे आमचं?...बरं तर, मी आतां निरोप घेतों. मला ताबडतोब सांखळीला गेलं पाहिजे. तिथें माझ्या मालाची होडी येणार आहे आज. एका व्यापाऱ्याला शंभर पोतीं मूग द्यायचे कबूल केले आहेत. तुम्ही दुपारीं जेवा अन् निर्धास्तपणें घरीं जा. तुमचे पैसे घरीं चालत येतील बरं!"

श्रीधरनं चिडक्या शब्दांतच ही सगळी हकीगत सांगितली. जनूभाऊंचा मुलगा पक्का थापाड्या असला पाहिजे हें मला तेव्हांवरूनच समजलं. 'अरे हरामा—!' असे माझ्या तोंडून चटकन् शब्द बाहेर पडले. पोरासारखाच जर बाप असेल तर त्याची स्वतः जाऊन चांगलीच हजेरी घेतली पाहिजे, असं मीं मनाशीं ठरवलं.

पण राहून राहून माझं मन मला सांगे, कीं जनूभाऊ शहाजोग आहे. माझ्या सासऱ्यासारख्या संशयानं पछाडलेल्या अन् बापावरसुद्धा विश्वास न ठेवणाऱ्या महाभागानं ज्या अर्थी बोटभर चिठ्ठीसुद्धा लिहून न घेतां जनूभाऊला एक हजार रुपये दिले, त्या अर्थी तो इभ्रतदार अन् वचनाचा धड असलाच पाहिजे.

पण मनाची ही ग्वाही विचारांत घेण्याच्या परिस्थितींत मी नव्हतों. खरं म्हणजे मला खूपच राग आला होता. जनूभाऊंना चार संतापाचे

शब्द बोलल्याशिवाय तो शमणार नव्हता. वेळेवर व्याजसुद्धा द्यायचं नाहीं अन् वर मिजास दाखवायची, हा कुठला न्याय? भेटूं दे तर खरा; मग सांगतों त्याला काय तें—अशा विचारांनीं संतप्त होऊनच मी एके दिवशीं सूर्यास्ताच्या सुमारास जनूभाऊंच्या ओटीवर चढलों.

"आई, हे बघ ग, कोण मामा आले आहेत" असं म्हणत एक सहा-सात वर्षांचा मुलगा घरांत पळाला.

"जा, त्यांना बसायला शेंदरी दे." आंतून आवाज आला.

मुलानं बाहेर येऊन चटई पसरली. गृहिणीनें दारांतून डोकावून मला 'बसा' म्हटलं. मी बसण्याच्या बेतांत होतों, इतक्यांत तिची दृष्टि माझ्या पायांकडे गेली. मी उन्हांतून चार कोस चालत आलों होतों आणि माझ्या पायांवर तांबड्या धुळीचा थर सांचला होता.

तिनं चटकन् पाण्याचा तांब्या बाहेर आणून ठेवला. आंगणाच्या मेरेवर एक पाथर होती. तिच्यावर उभा राहून मीं जेव्हां तें कढत पाणी पायांवर ओतलं, तेव्हां त्याच्या स्पर्शानं माझे पाय अत्यंत सुखावले. वाटचालीचे श्रम एका क्षणांत दूर झाले.

पाय पुसून भिंतीला टेकून बसल्यावर 'कुठून आलांत?' असं तिनं मला विचारलं. 'सत्रीहून' एवढंच मीं उत्तर दिलं. तिनं पुढें नांव गांव विचारण्याचा चौकसपणा दाखवला नाहीं. हातांत चरवी घेऊन गोठ्याकडे जात असतांना ती मला म्हणाली.

"दहा मिनिटं थांबाल ना? गोठ्यांत म्हैस आली आहे. धार काढतें अन् ताज्या दुधाचा चहा करून देतें."

मीं सहर्ष 'बरं आहे' म्हटलं. खरं म्हणजे मला या वेळीं कांहीं तरी गरम पेय हवंच होतं. माझा कोरडा घसा त्यासाठीं आतुर झाला होता. त्यांतून ताज्या दुधाचा चहा म्हणजे 'अयं विशेषः!' थोड्याच वेळांत चहाचा कप माझ्यापुढें आला अन् माझा तृषित आत्मा शांत झाला. क्रोधाची भावनाहि थोडी सौम्य झाली.

पाहुणा वस्तीला राहणार आहे हें तिनं ताडलं असावं. कारण दारापुढच्या झाडावरची एक मोठी हिरवी पपई तोडून ती ओटीवरच भाजी चिरीत बसली. विळीवर पपई कोचतांना तिच्या बांगड्या किणकिण वाजत होत्या. मला आपलं सहज वाटलं कीं, त्या काचेच्या बांगड्यांत दोन दोन सोन्याच्या बांगड्या असत्या तर तिच्या गोंडस हाताला फारच खुलून दिसल्या असत्या. पण तिच्या गळ्यांतहि मंगळसूत्रावांचून कांहीं नाहीं अन् लुगड्यालासुद्धा एकदोन ठिकाणीं ठिगळं आहेत, हें जेव्हां मीं पाहिलं तेव्हां मला कसंसंच वाटलं. पण काय असेल तें असो; ती बाई अंगाखांद्यावर कांहीं नसूनहि भरल्यासारखी वाटत होती. तिची प्रसन्न मुद्रा हें एकच त्याला कारण असावं. तिच्या तोंडांत सगळे दांतहि नव्हते. पण जे होते ते इतके स्वच्छ होते कीं हंसतांना तिच्या सांवळ्या मुखावर शुभ्र प्रभा पसरल्याचा भास होई.

हातानं काम चालू असतां मधूनमधून कांहींतरी विषय काढून ती माझ्याशीं बोलत होती. त्या बोलण्यांत अहंकाराचा किंवा आढ्यतेचा वाससुद्धा नव्हता. तिच्या मुलाचा—सखारामाचा—दंभ आणि दर्प हा आईचा अंश नव्हे तर, असं मला वाटल्यावांचून राहिलं नाहीं. तिच्या संभाषणाचा हेतु मला एकलकोंडं वाटूं नये हा होता, हें मीं ताडलं. मधून मधून ती आपल्या मुलाला ‘ मामांना सुपारी दे, पान दे ’ असं सांगत होती. तिच्या तोंडून निघणारा ‘ मामा ’ हा शब्द माझ्या हृदयांत कसल्या तरी संवेदना उत्पन्न करीत होता.

माझं नांवगांव तिला माहीत नव्हतं. मी तिच्या नवऱ्याचा सावकार आहें हेंसुद्धा तिला समजलं नव्हतं. आपल्या घरीं वसतीला आलेला ‘ एक माणूस ’ या भावनेनंच ती माझा असा मधुर सत्कार करीत होती.

आणि याचं प्रत्यंतर मला थोड्याच वेळांत आलं. डोक्यावर केळ्यांच्या घडांचे हारे वाहून घामाघूम झालेले चार कुळवाडी तिथं आले आणि त्या अंगणांत त्यांनीं आपलीं ओझीं उतरलीं. माझ्याप्रमाणेंच तेंहि रात्रीं तिथेंच मुक्काम करणार होते. मांडवाखालीं शेकोटीच्या भोंवतीं झोंपणार होते अन्

पहाटे उठून सांखळीच्या बाजाराला जाणार होते. हें तिनंच मला सांगितलं. तें त्यांचं मधलं पेणं होतं. जनूभाऊंच्या बायकोनं माझ्याइतक्याच आस्थे-वाईकपणें त्यांचीहि चौकशी केली. त्यांच्या मुलाबाळांची खबर विचारली. गूळपाणी प्यायला दिलं. थंडीचे दिवस होते तरी त्या गुळाच्या गोडीवर एकेकानं तांब्या तांब्या पाणी घोटलं.

“ जनूभाऊ कुठें गेले आहेत ? ” या एकाच्या प्रश्नाला ‘ फोंड्याला गेले आहेत, रात्रीं परत येतील ’ असं तिनं उत्तर दिलं. त्या कुळवाड्याच्या आधीं वस्तुतः तो प्रश्न मीं विचायला हवा होता. पण तिच्याशीं गोष्टी बोलण्यांत रंगून गेल्यामुळें मला त्याची विस्मृति झाली होती. पण तिच्या उत्तरावरून मात्र मला वाटलं कीं—

“ गृहस्थ मोठा अंतर्ज्ञानी असला पाहिजे. नेमका मी यायच्या दिवशींच परगांवीं निघून गेला. रात्रीं घरीं आला नाहीं तर ? मग उद्यां रहायचं. कितीहि दिवस मोडले तरी आतां व्याज घेतल्याशिवाम परत नाहींच जायचं. पाहूं तरी किती दिवस झुलवतो तें. ”

इतक्यांत ‘ चर्र चर्र ’ असा वहाणांचा आवाज अंगणांत ऐकूं आला. अंधुक होणाऱ्या संधिप्रकाशांतून एक व्यक्ति ओटीवर चढली. आणखी पाहुणा असेल अशी मला शंका आली. पण तो पाहुणा नसून घरधनी होता. जनूभाऊ आलेले पाहून माझा अर्धा जीव खालीं पडला. डोक्यावरचं ओझं जेव्हां त्यांनीं उभ्यानेंच खालीं टाकलं, तेव्हां त्यांतून दहावीस जोंधळ्यांचे दाणे बाहेर उडाले. कमींत कमी पांच पायली तरी ते दाणे असावे असा मीं तर्क केला. मीं मनांत म्हटलं, कीं गृहस्थ मोठा कष्टाळू दिसतो. मीं तर स्वतःच्या डोक्यावरून एवढं ओझं आणलं नसतं.

कमरेभोंवतीं घट्ट लपेटून बांधलेलं धोतर सोडी.. असतां ते माझ्याकडे पाहून हसले. मला पाहून त्यांना आनंद झाल्याचं दिसलं. ‘ आलांत ? बरं झालं. ’ असं म्हणून, दारांत उभ्या असलेल्या पत्नीला ते सांगूं लागले.

“ अग, यांना ओळखलंस का ? हे बाळंभटजींचे जांवई. आपले नवे सावकार—”

मला तो सावकार शब्द कसासाच वाटला. मीं म्हटलं.

“ माझी अशी ओळख करून देऊं नका जनूभाऊ ! तुमच्या धाकट्या मुलानं मी येताचं ‘ मामा आले ’ म्हणून घरांत वर्दी पोचविली होती. देण्या-घेण्याचा व्यवहार संपला कीं सावकारीचं नातं खुंटतं. मामाचं नातं हें निरपेक्ष नातं आहे. तेंच मला अधिक आवडलं. ”

“ तो बेटा सगळ्यांनाच मामा म्हणतो. कोणी चिमूटभर खाऊ हातावर ठेवील या आशेवर तो सगळ्यांशींच मामाचं नातं जोडतो. ”

नकळत माझ्या मनावर हा एक प्रहार झाला. त्या भाबड्या पोराची आशा माझ्याकडून पूर्ण झाली नव्हती. एका पैशाचे फुटाणेसुद्धा त्याच्यासाठीं मीं आणले नव्हते. तो बराच वेळ माझ्याभोंवतीं घुटमळत होता, त्याचं रहस्य मला आतां समजलं. शरमेनं माझा जीव विरघळला. दुसऱ्याच्या घरीं जातांना मी आजवर खाऊचा पुडा खिशांत ठेवायला कधीं विसरलों होतों का ? मग आजच कां मी असा उपटसुंभासारखा वागलों ? कारण आज माझी भावना वेगळी होती. मी इथें पाहुणा म्हणून आलों नव्हतों तर कुळाकडे पैसे वसूल करायला धनको म्हणून आलों होतों. घरून निघतांना माझी माणुसकी शाबूत नव्हती.

थोड्या वेळानं जनूभाऊ हातपाय धुऊन आले व आम्ही जेवायला बसलों. जेवतांना मीं सहज म्हटलं. “ तुमच्या घरीं पाहुण्यांची बरीच ये-जा दिसते. ” त्यावर वाढतां वाढतां जनूभाऊंची बायको म्हणाली.

“ वाडवडिलांची पुण्याई आहे म्हणून कोणीतरी टेकतं येऊन ओसरीवर.”

“ असल्या गोष्टीला पुण्याई कशाला हवी ? शितं असलीं कीं भुतं जमतात हवीं तेवढीं. ” मीं म्हटलं. यावर कांहीं तरी बोलण्यासाठीं म्हणून तिचे ओठ हालले. पण तिनें आपले शब्द आवरले.

मी आंचवायला बाहेर येतों तों त्या कुळवाड्यांचं जेवण आटपलं होतं. बाकीचे पाटावर हात धुवायला गेले होते अन् एक जण वाळलेल्या केळीच्या पानांत तंबाखू घालून विडी वळीत होता. मीं त्याला विचारलं.

" काय रे ? झालं का जेवण ? "

" खाली दादा भाकर अन् वर आईनं वाढलेली पेज प्यालों. आईच्या हातची पेज म्हणजे सर्वांगीं तेज ! किती गोरगरिबांच्या तोंडांत आईचा हात गेला असेल त्याची गणति देवानंच ठेवायची. या अंगणांत माझ्या-सारखे शेंकडों कुळवाडी कित्येक वेळां वसति करून गेले असतील. वाटेवरचं घर अन् भांगराचीं माणसं. मग काय विचारायला हवं ! असं वाटतं कीं मरावं अन् या आईच्या पोटीं जलम घ्यावा. "

ओटीवर माझ्या शेजारींच जनूभाऊंनीं आपलं आंथरूण घातलं. ते कुळवाडी तर केव्हांच झोपीं गेले होते. मी नुसता पडलों होतों अन् जनूभाऊं-कडे पैशांची गोष्ट कशी काढावी, याचा विचार करीत होतों. पण मला विचारावंच लागलं नाहीं. सगळीकडे सामसूम झालेली पाहून जनूभाऊंनींच तो विषय काढला.

" तुम्ही व्याज नेण्यासाठीं आलां असाल ? बरोबर आहे. कां येऊं नये तुम्हीं ? गेलीं दोन वर्षं माझ्याकडून कांहींच पोंचलं नाहीं तुम्हांला. तुमचे निरोप आले, पत्रं आलीं, तुमचा मुलगासुद्धा येऊन गेल्याचं कळलं. पण काय करूं ? कसलाच उपाय चालला नाहीं माझा. नाहींतर तुम्हांला हेलपाटा दिला नसता. हल्लीं माझी ग्रहदशा फिरली आहे. करावं तें आंगलट येतं. मनांत योजावं त्याच्या उलट होतं. आकाशांतल्या ग्रहांऐवजीं घरांतलाच एक खलग्रह मला पिडूं लागला आहे. गृहच्छिद्रं कोणाला सांगूं नयेत म्हणतात. पण तुमच्यापासून कशाला चोरून ठेवूं ? "

एवढं बोलून जनूभाऊ थोडा वेळ घुटमळले. मीहि ते काय सांगणार आहेत तें ऐकण्यासाठीं उत्सुक होऊन उठून बसलों. त्यांनीं विडीचा एक लांब झुरका घेतला, तोंड वर करून धूर हवेंत सोडून दिला अन् ते सांगूं लागले.

" सहा महिन्यांपूर्वीची गोष्ट. रुपयाला रुपया गांठवून मीं शंभरांची रक्कम तयार केली होती. दुसऱ्या दिवशीं तुमच्याकडे जायचं ठरवूनहि टाकलं होतं. म्हटलं तेवढे तरी तुमच्या हातीं लागूं देत. पण शेजारच्या गांवचा एक गृहस्थ त्याच दिवशीं संध्याकाळीं आमच्याकडे आला. आमच्या नात्यांतलाच होता तो. सखारामानं त्याच्या काजू खरेदी केल्या होत्या. अन् आठ दिवसांत पैसे देतों असं सांगून तो माल घेऊन आला होता. सगळीकडे जें करतो तेंच त्यानं याच्याशींहि केलं. नुसत्या थापा अन् भपका. वचनाला जागायचं हें तो कधीं शिकलाच नाहीं. आणि यालाच तो ' व्यापारी शहाणपण ' असं समजतो. त्या गृहस्थानं दोन महिने वाट पाहिली तरीहि सखारामाचा पत्ता नाहीं. शेवटीं तो उठून सरळ माझ्याकडे आला. येऊन अद्वातद्वा बोलूं लागला. सांखळीच्या भरलेल्या बाजारांत त्याचा कोट काढीन, चार लोकांना त्याच्या तोंडावर थुंकायला लावीन, एक ना दोन तोंडाला येईल तें बडबडला. मला वाईट वाटलं....पण करायचं काय ? आपलाच दाम खोटा तिथं दुसऱ्याचा काय दोष ?

" सखाराम अन् तुम्ही काय तें पाहून घ्या. मी या व्यवहाराला जबाबदार नाहीं, असं सांगून त्याला वाटेला लावावं असं एकदां मनांत आलं. पण दुसऱ्याच क्षणीं विचार बदलला. त्याचं म्हणणं रास्त होतं अन् शिवाय तो बोलल्याप्रमाणें करायला चुकला नसता. तसं कांहीं झालं असतं म्हणजे पोराबरोबरच माझीहि अब्रू गेली नसती का ? घराण्याची प्रतिष्ठा राखण्यासाठीं मीं हाडांचीं काडं केलीं तीं एवढ्याशा गोष्टीनं घालावायलो माझं मन तयार होईना. "

" मी मुकाट्यानं उठून घरांत गेलों. पेटी उघडली. त्या शंभर रुपयांतून पांचाची नोट बाजूला काढून ठेवली अन् उरलेले पंचाण्णव रुपये आणून त्याला दिले. इतकंच नव्हे ; तर मुलाचा शहाजोगपणा त्याला पटवण्यासाठीं वर धादांत खोटं बोललों.

" उगाच एवढं अकांडतांडव केलंत तुम्हीं. पंचाण्णव रुपयांसाठीं कांहीं आम्ही पळून जात नव्हतों. सखाराम मध्यंतरीं आजारी पडला म्हणून त्याला तुमच्याकडे येतां आलं नाहीं. परवां गांवाला जातांना तो हे पैसे मजकडे ठेवून गेला होता. मी उद्यां परवां तुम्हांला आणून देणार होतों. व्यवहारांत असं होतं कित्येक वेळां. पण माणसानं मनाचा असा तोल सोडून शिवीगाळीवर येतां कामा नये. "

" थप्पड मारल्यागत तोंड झालं त्याचं. मान खालीं घालून तो निघून गेला. एखादी मोठी लढाई मारल्याचा हर्ष झाला मला. पण लगेच तुमची मूर्ति डोळ्यांसमोर उभी राहिली अन् त्या हर्षावर विरजण पडलं. हे शंभर रुपये तर गेलेच होते अन् चार महिन्यांनीं आणखी शंभर रुपये द्यावे लागणार होते. मिळून झाले दोनशें. ही रक्कम आतां कशी द्यायची या काळजीनं मला घेरलं. हे पैसे आतां मुद्दलांत जमा होतील अन् हजारांच्या ऐवजीं बाराशेंवर व्याज भरावं लागेल या भीतीनं काळीज चरकलं. "

" पण बाण हातांतून सुटल्यावर हळहळून काय उपयोग ! पुत्रमोह म्हणतात तो हा ! आजवर त्याच्या अशा अनेक उचापती मीं निस्तरल्या आहेत. प्रत्येक वेळीं मी म्हणत आलों आहें कीं, ' यापुढें पोराच्या भानगडींत पडायचं नाहीं. तो जाणे नि त्याचं कर्म जाणे ! पाप त्यानं करावं अन् त्याचं प्रायश्चित्त मीं घ्यावं हा कुठला न्याय ? आणि अशा रीतीनें मी किती दिवस त्याला पुरा पडणार ! कधीं तरी तो माणसांतून उठणारच आहे. मग आजच त्याचा संबंध तोडला तर काय बिघडलं ? त्यामुळें कुटुंबाची वाताहात होते ती तरी थांबेल. ' पण कोणी त्याचा घेणेकरी आला कीं हे विचार कुठल्याकुठें जातात. वाटतं कीं पोराची आणखी एक वेळ पत वांचवावी. "

" या गोष्टीला दुसरंहि एक कारण आहे. मी कठोर झालों असतों. पण त्याची नाचक्की होण्याचा प्रसंग आला कीं बायकोचा जीव कासावीस होतो. तिचं आईचं आंतडं तुटायला लागतं. ती कांहीं बोलत नाहीं ; पण

डोळ्यांतून पाणी गाळीत बसते. अन् तिची म्लान मुद्रा पाहिली कीं माझा जीव व्याकुळ होतो. असा विपरीत झाला आहे आमचा संसार! धरलं तर चावतं नि सोडलं तर पळतं, अशा विचित्र परिस्थितींत सांपडलों आहें मी."

" मुलगा विचारीपणानं संसार करून माझ्या शिरावरचा भार हलका करील ही माझी आशा आतां संपली आहे. मी खालीं खालीं जात चाललों आहें. नवे नवे खड्डे पडत आहेत अन् ते भरून काढायला माझे हे जर्जर हात आतां असमर्थ आहेत. देह थकत चालला आहे. मनाला ही अशी कीड लागली आहे. खरं सांगायचं म्हणजे गोपाळराव, तुमचं कर्ज माझ्या हातून आतां फिटण्याची शक्यता दिसत नाहीं. "

मला एकदम धक्काच बसला तें ऐकून. मी आलों होतों व्याज वसूल करण्यासाठीं; पण व्याजच नव्हे तर मुद्दलसुद्धां बुडवायची तयारी केली या गृहस्थानं. हा चांगला शहाजोगपणा! मोठा वस्ताद प्राणी दिसतो—मीं मनांत म्हटलं.

आतां खवळलेला राग आवरून धरायला मला बरेंच सायास पडले. मनाला थोडं शांत केल्यावर मी जनुभाऊंच्या भूमिकेशीं समरस होऊन त्यांच्या दृष्टीनें विचार करूं लागलों. ते बोलले होते त्यांतलें अक्षरन् अक्षर सत्य होतें. माझें कर्ज बुडवावें अशी त्यांची इच्छा आहे असें मी कसें म्हणूं? त्यांनीं फक्त आपली असमर्थता प्रकट केली आणि ही गोष्ट खोटी आहे का? वार्धक्याचीं चिन्हें त्यांच्या देहावर उमटलीं आहेत. आणखी किती दिवस कष्ट करायचे यांनीं? ज्या पोरानं आतां संसाराचा भार शिरावर घ्यायचा त्यानंच जर अशी दिवाळखोरी आरंभली तर बिचाऱ्या बापानं तरी काय करायचं?

जनुभाऊंनीं माझ्याशीं मन मोकळें केलें होतें. हृदयावरच्या सर्व जखमा उघडून दाखवल्या होत्या. अशा स्थितींत त्यांना दुरुत्तर बोलणें किंवा सावकार-पणाच्या घमेंडीनें त्यांच्याशीं कठोर होणें म्हणजे जखमेवर मीठ चोळण्या-सारखें होतें. शिवाय माझ्या तोंडून वेडावांकडा शब्द गेला अथवा मीं सहा-

नुभूतिशून्यता दाखवली तर जनुभाऊंची बायको माझी काय किंमत करील याची मला भीति वाटत होती. तिच्या औदार्यानें आणि सौजन्यानें मी भारलों होतों. कां कोण जाणे; पण तिला दुखवलें तर माझें कल्याण होणार नाहीं, असें माझें अंतर्मन मला जाणीव देऊं लागलें होतें. त्या मुलाच्या तोंडचे 'मामा' हे गोड शब्द माझ्या कानांत घुमत होते. मामा म्हणजे आईचा भाऊ नव्हे का? अन् भावानें बहिणीची लाज राखायची का--

पण हजार रुपयांवर एकाएकीं पाणी सोडणें हेंहि माझ्या जिवावर आलें. तसें केलें असतें तर मुलानें मला वेड्यांत काढलें असतें. बायको धुसफुसली असती. मला कांहींच निर्णय करतां येईना. मनाच्या पिंजोळ्या होण्याची वेळ आली. शेवटीं मीं त्यांनाच विचारलें.

"आतां याला तोड काय?"

जनुभाऊ थोडा वेळ थांबले, त्यांनीं आंवढा गिळल्यासारखं केलं अन् म्हटलं.

"याला एकच तोड आहे. हें समोर दिसणारें माझें कुळागर. हें तुम्ही घ्या अन् मला या पापांतून मुक्त करा. लढाईचे दिवस आहेत. जमिनींचा भाव वाढला आहे. चार जाणत्या लोकांच्या विचारानं त्याची किंमत ठरवा. व्याजासह बाराशें रुपये तुमचे कापून घ्या. उरतील ते माझ्या हवालीं करा. तुम्ही मोकळे अन् मीहि मोकळा! मी आनंदानें तयार आहें या गोष्टीला."

"पण ठिकाण हातचें गेल्यावर तुम्ही काय करणार? खाणार काय अन् राहणार कुठें? काय ठरवलें आहे तुम्हीं–?" मीं विचारलें.

"एकदां हें घर सुटलें कीं दाहा दिशा मला मोकळया आहेत. जिथें जाईन तेंच माझें घर. कोण गोळाभर अन्न घालील तो मायबाप! पंढरीला सगळया संतांनीं माहेर म्हटलं आहे ना? तिथें जाऊन मला विठाईमाउलीच्या चरणांचा आसरा घेतां येणार नाहीं का?......"

जनुभाऊंचे हे शब्द माझ्या जिव्हारीं लागले. कर्ज फेडण्याचा त्यांचा हा उपाय बिनतोड होता; पण तो आत्मघातकी होता. मला कसेंसेंच वाटलें तें ऐकून. मीं त्यांना निग्रहानें म्हटलें.

" जनुभाऊ! ठिकाण विकण्याचा वेडेपणा तुम्ही करूं नका अन् तें विकत घेण्याचा निर्दयपणा मीहि करणार नाहीं. हातची जमीन गेली, सत्तेच्या घरांतून उठावा झाला कीं जन्मभर लाचारीनें दिवस काढावे लागतील तुम्हांला. स्थान नाहीं त्याला मान नाहीं! या हजार रुपयांवांचून माझी चूल अडलेली नाहीं. मला देवानं माझ्या कुटुंबापुरेसं भरपूर दिलं आहे. तुमची दानत चांगली आहे, एवढेंच मला पुरे! खरं म्हणजे हे पैसे माझे नाहींच आहेत. कायद्यानं जरी ते माझ्या वांट्याला आले असले तरी ते वसूल करतांना मला माणुसकी विसरतां कामा नये. सगळ्या गोष्टींचा विचार करतां 'तुम्ही मला एक पैही देऊं नका, तुमचं देणं फिटलं' असंहि मी म्हणूं शकेन; पण...तो तुमच्या गृहस्थी बाण्याचा अपमान होईल, तुम्हांला मीं भीक घातल्यासारखं वाटेल, म्हणून तसं म्हणत नाहीं. हे पैसे तुम्ही तुमच्या सवडीनं हाताशीं येतील तसतसे मला द्या. जे द्याल ते मी मुद्दलांतून फिटले असं समजेन. व्याज घेणार नाहीं. आणि तुमच्या दारीं धनको म्हणून कधींहि पाऊल ठेवणार नाहीं. आल्यागेल्याचें विश्रांतिस्थान अन् गोरगरिबांना अन्नपाणी मिळणारं हे वाटेवरचं नांदतं घर जर मीं मोडलं.—"

माझें हें वाक्य पुरें होण्याच्या आंतच 'गोपाळराऽऽऽव' म्हणून जनुभाऊंनीं मला मिठी मारली. त्याच क्षणीं दाराआडून एक हुंदका ऐकूं आला. 'उभ्या जन्मांत मला अशी सहानुभूति कुठेंहि लाभली नाहीं हो!' म्हणून जनभाऊंनीं गंगायमुना वाहवल्या.

त्यानंतर कोणीच कांहीं बोलूं शकलें नाहीं. मी स्वस्थ आंथरुणावर पडून राहिलों. पण मध्यरात्र झाली तरीहि मला झोंप येईना. माझें मन हलकें झालें होतें अन् कुठल्या तरी उंच वातावरणांत तरंगत होतें. पहाटेच्या

प्रहरीं माझा डोळा लागला तो सूर्योदयापर्यंत मी जागा होऊं शकलों नाहीं. ' चहा झाला आहे, उठा लवकर ' म्हणून जनुभाऊंनीं मला उठवलें.

चहा घेतल्यावर मी उठलों आणि घरीं जाण्यासाठीं रुमाल बांधला. अंगांत कोट चढवून अन् खिशांत चंची कोंबून मी जेव्हां निरोप घेण्यासाठीं घरांत गेलों तेव्हां जनुभाऊंनीं कागदांत गुंडाळलेलें एक पुडकें माझ्या हातांत आणून दिलें. मुलांना खाऊ म्हणून फणसपोळी बांधून दिली असेल अशा कल्पनेनें मीं तें तसेंच खिशांत घातलें.

" खिशांत ठेवायच्या आधीं उघडून पहा. " जनुभाऊ म्हणाले.

मी उत्सुकतेनें उघडून पहातों तों दहादहांच्या नोटांचा कवळा.

" मोजून घ्या. एक हजार पुरते आहेत. व्याजाचे दोनशें रहातात ते आतां पुढच्या वर्षीं. "

मी विस्मयानें वेडा झाल्यासारखा जनुभाऊंकडे पहातच राहिलों. हा गृहस्थ रात्रीं काय बोलला अन् सकाळीं हें काय करतो याचा मला उलगडा होईना. माझ्या हातांतून तें पुडकें गळून पडण्याच्या बेतांत आलें.

" असे भांबावूं नका गोपाळराव ! मला क्षमा करा. काल मीं तुमची थोडीशी परीक्षा पाहिली. मी रात्रीं बोललों त्या सगळ्या गोष्टी खऱ्या होत्या. आपल्या हातून कर्ज फिटणार नाहीं, मोकळ्या जिवाचं मरण मला लाभणार नाहीं असं हल्लीं मला वाटूं लागलं होतं. पण या वर्षीं दैवानं मला हात दिला. जन्मांत कधीं ऐकला नव्हता तो भाव यंदा सुपारीला आला. लढाई माझ्या पथ्यावर पडली. पंचवीस रुपये मणाप्रमाणें दोन खंडी सुपारीचे एक हजार रुपये कालच फोंड्याच्या व्यापाऱ्याकडून घेतले. हातांत पडतांच ठरवलं कीं, तुमचं देणं फेडून टाकायचं. यांतली एक पैहि घरांत ठेवायची नाहीं. ऋणमुक्त होण्याच्या आनंदांत घरीं येत असतां तें पांच पायली जोंधळ्यांचं ओझं मुळींसुद्धां जड वाटलं नाहीं मला. "

" घरीं येतों तों तुम्ही आलेले. तुम्हांला पाहून मला आनंद झाला. मनांत म्हटलं कीं, तिथि अन् भट यांचा मेळ जमला. लगेच रक्कम तुमच्या

पदरांत घालणार होतों; पण एकाएकीं विचार स्फुरला कीं, तसं करायच्या आधीं तुमची थोडीशी पारख करावी. अंतरींच्या भावना जरा चांचपून पहाव्या. ऋणको हा ऋण काढतो त्याच वेळीं माणुसकीला मुकतो. पण धनकोची माणुसकी तरी एखाद्या वेळीं कसाला लागायला हवीच का नाहीं ?"

"असली चमत्कारिक ऊर्मि माझ्या मनांत यायला एक कारण होतं. तुमचे सासरे बाळंभटजी हे आमचे उपाध्ये. गृहस्थ एरव्हीं लाख माणूस ! आपल्या यजमानपणाचा विलक्षण अभिमानहि होता त्यांना. निगर्वी अन् बोलाचालायला अघळपघळ. यजमानाच्या घरचा केर काढायचीसुद्धां वेळीं प्रसंगीं तयारी. पण पैशाचा प्रश्न आला कीं मग ते कोणाला ओळखीत नसत. पैसा हें त्यांचं वर्म होतं. अन् त्याला जरासा धक्का लागला तरी ते चवताळून उठत."

"एका महान् आपत्तीच्या प्रसंगीं मीं त्यांच्याकडून कर्ज घेतलं. दर-साल दरशेंकडा दहा रुपये व्याज ठरलं. पौष पौर्णिमा ही व्याज देण्याची तिथि निश्चित झाली. बाळंभटजी जगांत कुठेंहि असले तरी त्या तिथीला नेमके आमच्या घरीं हजर होत. एकाहि वर्षीं ते या नियमाला चुकले नाहींत. मींहि प्रथम चार पांच वर्षें न चुकतां व्याज देऊन त्यांची पाठवणी केली. पण पुढें सुपारीचा भाव घटला. घरांत खाणारीं तोंडं वाढलीं. त्यामुळें माझी ओढाताण होऊं लागली. पण माझ्या परिस्थितीची त्यांना पर्वा नव्हती. एका वर्षीं त्या तिथीला माझ्याकडे पैसे जमले नाहींत तर त्यांनीं माझ्या दारांत भर बारा वाजतां स्वतःला गळफांस लावून घेण्यापर्यंत पाळी आणली. माझे उपाध्ये बाळंभटजी ते हेच का असा मला त्या दिवशीं भ्रम पडला. त्यांची ती त्या वेळची भेसूर मुद्रा आठवली कीं अजूनहि माझे हातपाय लटपटतात."

"त्या दिवसापासून कानाला खडा लावून घेतला. पौष पौर्णिमेला अन्य मार्गांनीं पैसे जमणार नाहींत असं वाटलं कीं घरांतला एखादा दागिना विकून गांठ तयार ठेवायची. अशा रीतीनें बायको लंकेची पार्वती बनली.

सोनं नाणं होतं तें व्याजापायीं धुऊन निघालं. पंधरा वर्षांत पंधराशें रुपये व्याज घेऊन बाळंभटजी निवर्तले. हल्लीं त्यांना माझ्या ठिकाणाचा लोभ सुटला होता. ‘ तुमच्या हातून आतां कर्ज फिटणें शक्य नाहीं ; तेव्हां तुम्ही आपलं ठिकाण माझ्या नांवावर करून द्या ’ असं त्यांनीं माझ्यामागें टुमणं लावलं होतं. पाहूं या, करूं या म्हणून मी दिवसगत करीत होतों. ”

“ त्यांचेच तुम्ही जांवई. त्यांच्या जिंदगीचे वारस. आमचे नवे सावकार. तेव्हां मी कांखा वर केल्यावर तुमच्या रागाचा पारा किती चढतो आणि तुमच्याहि मनांत त्यांच्यासारखाच घरबुडवा लोभ आहे कीं काय हें मला पहायचं होतं. तुम्ही रागावून दमदाटी करूं लागलां असतां अथवा ठिकाणाचं नांव काढतांच तुमच्या तोंडाला पाणी सुटलं असतं तर मीं लगेच तुम्हांला म्हटलं असतं.

“ महाराज, समजली तुमची दानत. ही रक्कम मोजून घ्या, पावती द्या अन् वाट धरा ! ”

“ पण तुम्हीं मला निराळाच अनुभव दिलात. माझ्या कल्पनेच्या पलीकडे तुम्ही गेलांत. तुम्ही माणूस आहां. देवानं तुम्हांला हृदय दिलं आहे अन् त्यांत दयेचा पाझरहि आहे. तुम्हीं मला जिंकलंत. कर्ज फिटलं तरीहि जन्माचा ऋणी करून ठेवलंत. दुसऱ्याच्या परिस्थितीचा सहानुभूतीनं विचार करून त्याला दिलासा देणारे सज्जन जगांत आहेत हें तुमच्यावरून मला पटलं. गोपाळराव... ! असेच मनाचे मोठे रहा ! कधीं काळीं अंतः-करणाचा भार हलका करण्यासाठीं तुम्हांला हांक मारली तर धांवून या. ! ”

जनुभाऊंना पुढें बोलवेना. मी तरी काय बोलणार होतों याच्यावर ! ” त्या पैशांचा मला त्यागहि करतां येईना अन् स्वीकारहि करवेना. किती तरी वेळ पाणावलेल्या डोळ्यांनीं आम्ही समोरासमोर उभे होतों. माझ्या हातांतल्या त्या नोटांवरचे मुखवटे, आपली काय वाट होणार याची प्रतीक्षा करीत होते. माझा विजय होऊनहि मी पराभूत झालों होतों. माझ्या

सासऱ्याची ती वर्तणूक ऐकून माझ्या मनांत शरम उत्पन्न झाली होती. त्यामुळें तें सगळें द्रव्य खिशांत घालायला माझा हात धजेना. त्या पैशांच्या मागें असलेला कटु इतिहास मला तसं करूं देईना.

शेवटीं मीं त्यांतले पांचशें रुपये मोजून वेगळे काढले अन् जनुभाऊंची बायको दाराशीं उभी होती तिच्यापुढें नेऊन ठेवले.

"ताई, हे तुझ्या चोळीबांगडीसाठीं तुला दिले आहेत. धाकट्या भावाची ही प्रेमाची भाऊबीज अव्हेरूं नकोस !"

आणि तिच्या होकार-नकाराची वाट न पहातां मीं पाठ फिरवली अन् अंगणाच्या पायऱ्या उतरून तडक चालता झालों.



## ४ लंगडा बाळकृष्ण

आज माझी प्रकृति कुरकुर कां करते कळत नाहीं. शरदृतूंतलं मवाळ ऊन, पण तेंच अंगावर घेऊन माझं डोकं दुखूं लागलं आहे. शेतावर भाताची मळणी चालू आहे. ती पांडूच्या जिवावर टाकून मी घरीं आलों आहें अन् ओटीवर बसून अंगावरचीं गवताचीं तुसं पंचानें झाडीत आहें.

दिवाळीकडचे दिवस मोठे मजेचे असतात, तसाच आजचाहि आहे. सृष्टीनें न्हाऊन धुऊन अंग कोरडं केलं आहे आणि ती नव्या नवरीसारखी टवटवीत दिसत आहे. मात्र आमच्या दारांतला देखावा कांहीं तितकासा चांगला नाहीं. अंगणाच्या मेरेपलीकडे वाढलेलं तेरड्यांचं रान, अंगांतला रस सुकून गेल्यामुळं मान टाकूं लागलं आहे. टाकळयाला टपोऱ्या शेंगा घोसाघोसांनीं लटकल्या आहेत खऱ्या; पण त्याचींहि पानं पिवळीं पडलीं आहेत. अन् अंगणांतल्या मांडवावर चढवलेला पावसाळी दोडक्याचा वेल—त्यावरच्या शेवटल्या दोडक्यांची भाजी आज दुपारींच आमच्या पानांत पडली अन् आतां सुकून गेलेल्या त्या वेलाला तोडून, ओढून आंगण मोकळं करायचं असं भावजय आजच म्हणाली आहे. निरुपयोगी वस्तूची अडगळच होते नाहीं तरी!

घराच्या सांवलींत येऊन बसल्यावर माझा मस्तकशूळ उतरला आहे.. आणि त्याला दुसरंहि एक कारण आहे. आज आमच्या घरीं दिवाळीसाठीं पोहेकांडणं चाललेलं आहे. पाटाखालची पार्वती, व्हाळापलीकडची सुभद्रा

शेजारच्या घरांतली सुंद्रा अशा चार-पांच बायका जमल्या आहेत. बऱ्याच दिवसांत इतक्या बायका एकत्र पहायला मिळाल्या नव्हत्या. बाकी त्यांना आमच्याकडे येणंच भाग होतं म्हणा. कारण आमची भावजय–रमा— गेली होती ना त्यांच्या घरीं त्याच कामासाठीं. शेजारधर्मच आहे हा !

धगधगत्या चुलीजवळ बसून सुंद्रा भिजलेलं भात खापरांत भाजीत आहे. तिच्या हातांतली ती पसरट हिरवणी डौलदारपणें खापरांतून फिरत आहे. तिचा हात कसा गोरा गोंडस आहे. पण काचेच्या बांगड्यांना धग लागूं नये म्हणून तिनं आपलं मनगट एका कळकट फडक्यांत गुंडाळून घेतलं आहे. छे ! मला नाहीं आवडलं तें. बाकी श्रमानं लाल झालेल्या गालांवरून निघालेल्या घामाच्या धारा, कानाखालच्या केंसांतून गळयावर उतरल्या कीं तरण्या बायका किती छान दिसतात—

भाजलेला प्रत्येक घाणा माझी पुतणी शांता उखळांत नेऊन ओतीत आहे. रमा नि सुभद्रा त्यावर मुटके घाव घालीत आहेत. ‘ चुर्र चुर्र ’ आवाज अन् त्याच्या मागून त्या नव्या भाताचा उबदार सुवास बाहेर येत आहे. रमेच्या डाव्या पायाजवळच्या सुपांत कोंड्यासकट पोह्यांची शींग लागली आहे. मुकुंदा, चिमा हीं त्या सुपावर डोळे लावून बसलीं आहेत. कांडण संपल्यावर मूठपसा त्यांना मिळायचा आहे. माझीहि वर्णी लागेल बहुधा. नागवेलीला मिळालं तरच शेवग्याला पाणी मिळायचं ! बरेच दिवस दहींपोहे खायची इच्छा होती. आज ती पुरी होईल असा रंग दिसतो. शेवटचा घाणा होईपर्यंत बसून राहिलं पाहिजे इथं.

पण रमेच्या कपाळावर आठ्या पडल्या आहेत. तिला माझं इथं बसणं रुचत नाहीं हें मला कळतं. मी भिंतीशीं टेकतांच ती कांहीं तरी पुटपुटली. मला ठाऊक आहे काय म्हणाली असेल तें—‘ बसले उत्तरमहाराज जेठा मारून. आतां सगळया बायका जाईपर्यंत इथून हालायचे नाहींत ’... पण आज मी रमेला भीक घालीत नाहीं. माझ्या स्वतःच्या घरीं बसलों आहें मी. बाकी ती म्हणते तें कांहीं अगदींच लटकं नाहीं. चार बायका एकत्र

जमलेल्या दिसल्या कीं तिथून हालूंच नयेसं वाटतं मला. अन् बायकांनासुद्धां माझ्याशीं बोलायला हंसायला संकोच वाटत नाहीं. आतां माझा भाऊ—रमेचा नवरा इथं उगवूं दे. सगळ्या कशा लाजाळूंचीं झाडं बनतील. हें असं कां ?

धप्...धप्...धप्...कसे लयींत घाव बसताहेत पोह्यांवर ! ही वहाळा-पलीकडची सुभद्रा आहे अळसुंद्याची शेंग; पण कामाला मोठी दमदार दिसते. रमेसारख्या तगडया बाईबरोबर टिकाव धरणं म्हणजे काय सामान्य गोष्ट आहे ! तांबूस चंद्रकोरीसारखीं नखं अन् मऊ मऊ बोटं असलेल्या तिच्या हातांत तें मुसळ कसं पेलतं कुणाला ठाऊक ! बायका म्हणजे अजब असतात खऱ्या बुवा...

त्यांचं हें कांडणं पहातांच मला सुखाचे डोल येत आहेत. अरेच्या... पण ही तांबू गाय इतक्या लवकर कशी घरीं आली ? गळ्यांत ठोकरी बांधूनसुद्धां राखण्याला हिच्यावर नजर ठेवतां आली नाहीं. व्याल्यापासून तर तिचा पायच टिकत नाहीं रानांत. वासराची फार ओढ आहे तिला. पण मला तिचा राग येतो तो हा कीं, ती वासराच्या मायेसाठींच त्या म्हाताऱ्या पवळया बैलाच्या पाठींत उगीच शिंग खुपसते. तो बिचारा वासराच्या वाटेलासुद्धां जात नाहीं.

मला वाटलंच होतं कीं रमा मला हुकूम फर्मावणार. ‘ भावजी, त्या गाईला गोठ्यांत आणून बांधा. ’ तिला आयतंच निमित्त मिळालं मला उठ-वून लावायला. ‘ मी आतां हिच्यामागून पाठीमागून कुठवर पळूं ? ’ ह्या पोफळीच्या रोपाचा एक घास काढ, त्या केळीचं एक सोपट ओढ, असं करीत ही आतां सगळं कुळागार पालथं घालील. तरी मी रमेला वेळोवेळीं बजावतों कीं असलीं धांवपळीचीं कामं तूं मला सांगूं नकोस. जन्मापासून माझा उजवा पाय हा असा अधू. टांच कशी ती लागतच नाहीं. जमिनीला नुसता पुढचा चवडा टेकीत दीड पायावर चालायचं. आईबापांनीं माझं नांव बाळ-कृष्ण कां ठेवलं कोण जाणे ! त्यामुळं ‘लंगडा बाळकृष्ण’ म्हणून चिडवायला

लोकांना आयतंच फावतं. लोक हसतात ; पण मला त्यापायीं किती यातना होतात यांची त्यांना काय कल्पना ! ' परदुःख शीतळ ! '

एखादा दिवस वाटचाल खूप झाली, कुळागाराचं सगळं शिपणं मला एकट्यालाच करावं लागलं, कीं रात्रीं पायाच्या शिरा अशा ठणकूं लागतात— वाटतं कोणीं तरी चेपावं, दाबावं, पण आहे कोण माझं हक्काचं माणूस !... कण्हायचं, विवळायचं, आपणच पायाला चिंधी आंवळायची अन् तेवढ्यानंहि भागलं नाहीं तर निर्दयपणें बुक्या मारून घ्यायच्या. मीं कांहींहि केलं तरी रात्रीच्या वेळीं रिकाम्या ओटीवर असतं कोण बघायला ?

" तांऽऽबूऽऽ ! " केवढ्या मोठ्यांदा ओरडलों मी तिच्यावर ! पण ती वस्ताद गाय मला कसची दाद देते ! ती किंचित् थबकली अन् मानेला झटका देऊन चौखूर उधळली. आमची रमासुद्धां नापसंती दाखवायची झाली कीं असाच मानेला झटका देते. माणसाच्या बऱ्या वाईट खोडी संसर्गानें जनावरांनासुद्धां लागत असाव्या.

किती जोरानें पळतोंय मी हिच्या पाठीमागून ! आज माझ्या या दिडक्या पायांत कुठली शक्ति संचरली आहे कोण जाणे. मला शक्य तितक्या लवकर या गाईला गोठ्यांत घातलीच पाहिजे. नाहींतर पोहे चुकायचे. हजीर तो वजीर. मी नसलों तर रमा सगळ्यांच्याबरोबर मूठभर पोहे माझ्या वाटींत घालून ठेवील ? नांव कशाला ?

अन् पोह्यांबरोबरच दुसरीहि गोष्ट कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. पोहे कांडून झाल्यावर श्रमानें शिणलेल्या त्या सगळ्या बायका घटकाभर कोंडाळं करून बसतील अन् झेंडूच्या फुलांच्या वेण्या करून एकमेकींना माळतील. मला त्या वेळीं तिथं असलंच पाहिजे. कारण तीं झेंडूचीं फुलं शेतावरून येतांना ओटींतून मीं आणलीं आहेत. त्यांनीं वेण्या माळाव्या, सुंदर दिसावं, अन् मला...पण असल्या भलत्या सलत्या अपेक्षा नाहींतच माझ्या ' भाऊजी किती चांगले आहेत. त्यांनीं आमच्यासाठीं आवर्जून फुलं आणलीं हो ! ' एवढे शब्द ऐकायला मिळाले तरी आपण खुष.

'भाऊजी' या नात्यानें माझा कोणीं उल्लेख केला किंवा हांक मारली कीं मला किती आनंद होतो म्हणून सांगू! वाटतं कीं माझे अन् माणूसजातीचे धागेदोरे कांहीं अगदींच तुटलेले नाहींत. लंगडा असलों, मुखदुर्बळ असलों तरी या चिमुकल्या गांवांत मीहि एक कोणीतरी आहे.

पण गाईच्या गळ्याला दावं लावून घाम टिपीत मी पडवीवर येतों तों काय? सगळाच बाजार उलगला आहे. ओसरीवर केरसुणीसुद्धां फिरली आहे. पोहे सोडाच; पण कोंडासुद्धां कोठें दिसत नाहीं. अन् तीं झेंडूचीं फुलं आंगणांत विखरून पडलीं आहेत. त्यांचा कोणीं आदर केला नाहीं. कोणीं त्यांना मायेनं जवळ घेतलं नाहीं. कां बरं? माझ्या हातांनीं खुडलीं गेल्यामुळं तीं काळीं पडलीं असतील का? कढत होऊन बायकांच्या हातांना चटका का दिला त्यांनीं? मला रहावेना. मीं तीं फुलं गोळा केलीं अन् सरळ तांबूच्या पुढ्यांत नेऊन टाकलीं. तिनं त्यांचा चट्टामट्टा करीपर्यंत मी तिथं पहात उभा राहिलों.

घरांत आल्यावर वाटलं कीं, रमेला पोह्याबद्दल विचारावं. पण तिनं म्हटलं असतं, 'कातरवेळ झाली दिसते ना! या वेळीं कोणी खातात वाटतं?' न कर्त्याचा वार शनिवार तसा न देत्याचाहि!

शेतांतल्या खळ्यावर अजून एका उडव्याची मळणी व्हायची राहिली आहे. अर्थात् कोणीं तरी राखण म्हणून रात्रीं तिथं झोंपायला गेलंच पाहिजे. अन् तें कोणीं तरी म्हणजे मी! रात्र अंधारी आहे; पण आज बहुधा मला कंदिल मिळेल असं वाटत नाहीं. कारण भाऊ कसले तरी देण्याघेण्याचे कागदपत्र काढून वाचीत बसला आहे. जळतं कोलीत विंझरीत त्या पाळंदीं-तून जायचं म्हणजे मरण आहे अगदीं. पावसाळ्यांत ओहोळाचं पाणी वाहून वाहून जागोजाग खड्डे पडले आहेत. मधून मधून अणकुचीदार दगड वर निचकले आहेत ते कुच् कुच् पायांत घुसतात. भाऊच्या वहाणा हळूच चोरून नेल्या असत्या; पण माझ्या दिडक्या पायाला त्यांचा काय उपयोग? पाळंदीच्या दुतर्फा दिंड्याची राई माजली आहे. सबंध दिवस

तळपून गेला तरी एक किरण शिरकत नाहीं त्या जागीं. रात्रीं तर काय, काळोखाचं काळीजच फुटतं.

चार खुंट अन् वर दोन माडांचीं चुडतं या देवाच्या आसऱ्याखालीं मी एक कांबळ टाकून माझीं मूठभर हाडं पसरलीं आहेत. एका बाजूला गवताचा ढीग अन् दुसऱ्या बाजूला भाताचं उडवं असल्यामुळें झोंबत्या वाऱ्याला अटकाव होईल, पण पहांटेच्या आभाळाचे अश्रु मात्र चुडतांच्या विरळ पात्यांतून माझ्या अंगावर ठिबकणार. बाकी माझी गोधडी भक्कम जाड आहे म्हणा. ती पुरती भिजायच्या आंतच कोंबडा आरवेल.

पलीकडच्या मोठ्या शेतांत खळयाखळयांवरून लोक झोंपलेले आहेत. पण आमचं शेत हें इकडे बाजूला पडल्यामुळें त्यांची सोबत मला कशी मिळायची ! सभोंवतीं अन् माथ्यावर ओतलेला गडद अंधार. अशा जागीं एकट्यानं रात्र काढायची म्हणजे...पण संवयीनं माणूस सगळं पचवतो हेंच खरं. जरा कुणाची चाहूल लागली कीं उशागती ठेवलेला हा डबा जोरजोरानं बडवायचा हा माझा भयावरचा रामबाण उपाय.

आकाशांत अश्विनीच्या घोड्याचं तोंड बरंच वर आलं आहे. तेव्हां प्रहर रात्र उलटून गेली असावी. आग्नेयीच्या कोंपऱ्यांत तो एक तारा लुक-कुकतो आहे. काय बरं नांव असावं त्याचं ? बिचारा त्या बाजूला एकटाच पडला आहे. कुटुंबांतल्या मंडळींनीं त्यालाहि माझ्याचसारखं बाजूला टाकलं असावं.

खरं म्हणजे आज भाऊनं इथं झोंपायला यायला हवं होतं. झालीं कीं आतां दोन तीन मुलं. माझी प्रकृति बरी नाहीं हें जेवायच्या वेळीं त्याच्या कानावर घातलं होतं. पण त्यानं तें आईकनाईकच केलं. भाऊ तसा वाईट नाहीं म्हणा. पण रमेपुढें त्याचं कांहीं चालत नाहीं. तिला एखादी गोष्ट विरुद्ध झाली कीं ती केवढाले डोळे करते! भाऊवरच नव्हे; तर माझ्यावर सुद्धां. मला त्या वेळीं काय वाटतं तें सांगतां येत नाहीं. एका बाजूनं राग येतो अन् दुसऱ्या बाजूनं वाटतं कीं तिनं असंच बघत रहावं.

काय तिच्या डोळयांत जादू आहे देव जाणे ! प्रेमानं नसली तरी रागानं तरी ती माझ्यासमोर उभी राहते हें काय थोडं झालं ! आणि मग भेदरलेल्या नजरेनं तिचे तंग पुष्ट दंड, तें झांकलेलं पण श्वासोच्छ्वासाबरोबर खालीवर होणारं हृदय अन् डोळयांचा काळाभोर वर्ण चोरायला आलेल्या त्या केसांच्या लहरत्या बटा, हें सगळं मी पाहूं शकतों. कित्येक वेळां ती मला हंसते. क्षणैक तिचे लांबट धारदार दांत चमकतात अन् उजव्या बाजूच्या कोपऱ्यांत जिवणीला सुंदर मुरड पडते. मला ठाउक असतं कीं त्या हसण्यांत माझी निर्भत्सना आहे. मला त्याचा मोह आवरत नाहीं. पुन्हां पुन्हां मी कांहीं तरी बावळटपणा करतों अन तिला तें मिस्किल हसूं आणायला लावतों. खरंच, रमा घरांत आल्यापासून घर कसं भरून ओसंडत आहे.

पण कांहीं कांहीं वेळां ती इतकी रागावते, कीं घरावरचीं कौलंसुद्धां उडूं लागतात. मला तर असह्य होतो तिचा राग. झालीं सात आठ वर्षं त्या गोष्टीला. दुसऱ्या दिवशीं अंगांत घालण्यासाठीं धुऊन खुंटीवर ठेवलेली तिची चोळी कुठें नाहींशीं झाली होती. फाटकी अन् विटकीच. पण त्यासाठीं कोण महिषासुरमर्दिनीचा अवतार आणला तिनं ! कोपरान् कोपरा धुंडाळण्याच्या मस्तींत घरांतलं सगळं चिरगुट पांघरूण अस्ताव्यस्त पसरलं. सुपाएवढ्या नशिबाचा म्हणून मी वांचलों त्या दिवशीं. माझं आंथरूण शेतांतल्या माळयावर होतं अन् मी त्या दिवसांत शेतावरच झोपत होतों. त्या रात्रीं मी लवकरच माळयावर आलों अन् ती चोळी एका मोठ्याशा दगडाला गुंडाळून जवळच्या ओढ्यांत टाकून दिली, तेव्हां माझा जीव भांड्यांत पडला. दोन रात्रीं त्या चोळीनें माझ्या हृदयाला—पण आतां त्या गोष्टीची आठवण झाली तरी लाज वाटते.

माझं लग्न करावं म्हणून वडिलांनीं खूप प्रयत्न केले. मुली सांगून येईनात म्हणून स्वतः जाऊन कित्येक मुलींच्या बापांना गळ घातली. पण कोणीच त्यांच्या पदराला हळकुंड सुपारी बांधली नाहीं. 'लंगड्या दुबळयाला मुलगी देण्यापेक्षां विहिरींत लोटलेली काय वाईट' असंच जो तो म्हणे. भाऊला

मुली सांगून येत; पण मोठ्या भावाच्या डोक्यावर अक्षता पडल्याशिवाय धाकट्या भावाचं कसं जमायचं, या विचारानें वडील, घरीं आलेल्या वधू-पित्यांना 'यंदा कर्तव्य नाहीं' म्हणून नकार देत. पुढं भाऊलाहि कोणी विचारीना. शेवटीं 'तेलहि गेलं, तूपहि गेलं' असं होऊं नये असा पोक्त विचार करून वडिलांनीं भाऊला एक मुलगी आली ती साधून घेतली.

पण त्या लग्नांतलीसुद्धां गंमत पहा. भाऊ नवरदेव म्हणून बाशिंगाचे गोंडे हालवीत लग्नाला गेला. वडील अन् आई, व्याही-विहीण म्हणून मिरवत गेलीं. बहीण करवली म्हणून तोऱ्यांत गेली. अन् मी?...घरराखणा म्हणून घरींच राहिलों अन् अमसुलांच्या लाल तिखट कढीशीं शिळे गोटे जेवलों.

घरभरणी आल्यावर त्याच रात्रीची गोष्ट. रमा अन् तिची पाठराखीण पाटावर आंचवायला चालल्या होत्या. मी तिकडून परत येत होतों त्या वेळीं पाठराखीण तिला म्हणाली,

"हे तुझे थोरले भाऊजी."

"हे का? इश्श!"

रमेनें उष्टा हात तोंडाला लावला. जखमेवर मीठ चोळल्यासारखं वाटलं मला.

फटफटीत उजाडलं आहे. पूर्वदिशेच्या आंगणांत भिरंडांचा आगोळ ओतला आहे. एक पाखरांचा थवा उगवत्या अरुणाला सामोरा निघाला आहे. शेताच्या मेरेवरचं ओलं गवत मोत्यांचे दागिने घालून बसलं आहे. पसरीसाठीं पहांटेच्या प्रहरीं सोडलेल्या गाई पोटभर चरून आतां घरीं निघाल्या आहेत. या वेळीं किती प्रसन्न वाटतं मनाला! पण मी असा वेड्यासारखा उभा काय राहिलों! लवकरच घरीं जाऊन तांबूची धार काढली पाहिजे कीं. रमेला फेसाळ दुधानं भरलेली कासंडी हवी; पण गाईच्या लाथा मात्र खायला नकोत. त्या कामीं या लंगड्या बाळकृष्णानंच पुढं झालं पाहिजे.

गोठा झाडून खरवडून साफ झाला. शेणाच्या पाट्या कुळागरांतल्या गायरींत जाऊन पडल्या. गुरं राखण्याच्या स्वाधीन झालीं. त्यामुळें आतां सकाळच्या न्याहारीवरचा हक्क लागू झाला आहे. पाटावर स्वच्छ हातपाय धुऊन मीं रमेला विचारलें.

" खायला काय ठेवलं आहेस ? "

रमेनें उत्तर द्यायच्या ऐवजीं एक लांकडी पाळें माझ्यापुढें ठेवलें आहे. काय आहे त्या पाळयांत ? नाचणीचें लाहीपीठ अन् वर आंबट ताक. किती निराशा झाली माझी ! मीं हळूच म्हटलं — दहीपोहे कां नाहीं दिलेस ?

एकदम रमेच्या तोंडावर लाही फुटली आहे.

" मेल्यांनीं अगदीं ओठावर जीभ टाकली आहे. दिवाळीच्या दिवशीं खा कीं पोट फुटेस्तवर दहीपोहे. दुकळांतून आले आहेत जसे कांहीं. पोरं तरी बरीं यांच्यापेक्षां—"

मी खातों का उपाशीं रहातों, तें पहायला रमा थांबली नाहीं. ती आपल्या मोकळया केसांना तेलाच्या हातानें कुरवाळीत शेजारच्या सुंद्री-कडे वेणी घालायला गेली आहे. भाऊचें आज सकाळपासून दर्शन नाहीं. कोणापुढें मांडूं माझें गाऱ्हाणें ! आज दहीपोह्यांची आशा कडोविकडीला गेली आहे. कणगींतलें पंचांत मावेल एवढें भात उचलून न्यावें नि गांवांत कोणाला तरी—म्हणजे त्या वहाळापलीकडच्या सुभद्रेला देऊन त्याच्या मोबदल्यांत खच्चून दहीपोहे खावे, असें मनांत येत आहे.

हो, काय हरकत आहे ? कणगींतल्या भातावर माझा हक्क आहे. भात ज्या शेतांत पिकलें तें मीं तयार केलें आहे. त्या शेतांत बीं पडण्यापूर्वीं माझ्या घामाच्या धारा पडल्या आहेत. कांहीं वर्षांपूर्वीं आम्हांला शेतच नव्हतें. पायली, अधोली कोणीं तरी पोह्यासाठीं भात आणून दिलें कीं

वडिलांना परब्रह्म हातीं आल्यासारखें वाटे. एक दिवस आजच्या त्या शेताच्या बाजूला फिरत असतांना वडील मला म्हणाले.

" बाळकृष्णा, ही जमीन चांगली आहे. हिला खालून ओलावा आहे. इथलं गवत कधीं वाळत नाहीं. प्रयत्न केला तर हिला शेताचा आकार आणतां येईल. हक्काचे चार दाणे घरांत येतील. "

मीं ते वडिलांचे शब्द झेलले. दुसऱ्याच दिवशीं सूर्योदयाच्या वेळीं मी तिथें ठाकलों. माझ्या हातांतला पाळ कचाकच झाडें झुडपें जमिनीवर निजवूं लागला. सगळें रान तोडून एक दिवस ' अग्नये स्वाहा ' केलें. तोडलेल्या प्रत्येक बुंध्याभोंवतीं खणून मीं त्यांचीं पाळेंमुळें उपटून टाकलीं. उखरपाखर जमीन सरळ केली. रानांतले दगड डोक्यावर आणून बांध रचले. पद्धतशीर खाचरें तयार केलीं. वडील थकलेले असल्यामुळें मला हातभार लावूं शकत नव्हते. भाऊ अधूनमधून यायचा, थोडा वेळ आंग मोडून खपत असल्याचा आव आणायचा अन् हळूच पसार व्हायचा. कामापेक्षां घरचीच ओढ त्याला अधिक होती. कुदळ हाताळण्यापेक्षां रमेची खुषमस्करी करण्यांतच त्याचा दिवस निघून जायचा.

मला असा राग येत असे त्याचा—त्या जोडप्याचे ते नजरेचे खेळ, तें हसणें मुरडणें बघितलें कीं काळजांत आग उठे. मीहि त्या वेळीं भर जवानींत होतों. पण माझ्या वांट्याला सक्तीचें तुरगब्रह्मचर्य आलें होतें. रात्रीच्या वेळीं नको ते विचार उसळून उठायचे अन् झोपेला पंख फुटायचे. तारवटलेल्या डोळ्यांनीं सकाळीं अंथरुणावर लाथ मारायची. हा मुका मार जेव्हां सहन होईना, तेव्हां मग मी कैफ चढल्यागत अधिकच काम करूं लागलों. हेतु हा कीं, शरिराची नस न् नस शिणावी, दमावी अन् रात्रीं आंथरूणावर आंग टाकतांच मेल्यागत झोंप लागावी.

तीन वर्षांच्या सक्त परिश्रमानंतर आमचें नवें शेत तयार झालें. वडिलांनीं बैलांची जोडी विकत घेतली. भाऊनें नांगर धरला. अनुधार कोसळणाऱ्या मेघराजाच्या कृपेंत इरलें माथ्यावर घेऊन रमा शेताच्या बांधावरून खालीं

उतरली. तिनें लुगडें खूपच वर आवरून घेतल्यामुळें तिच्या गोऱ्या गुब-गुबीत मांड्या अर्ध्या उघड्या पडल्या होत्या. मला वाटलें कीं, सांचरांतला मऊ मऊ चिखल दाबीत दोन केळींचे गाभेच पुढें येत आहेत. शेजारीं शेजारीं ओणवें राहून आम्हीं दोघांनीं तरू लावले. मधेच एकाद् वेळीं मान वळवतांना तिच्या इरल्याचा धक्का माझ्या घुरमटच्याला लागे अन् आधींच गारठून गेलेल्या माझ्या उघड्या अंगावर पावसाच्या शेंपन्नास धारा सडसडून जात. त्या वेळीं माझा उभा सांगाडा थरारून जाई; पण आंतून उबदार झिणझिण्याहि उठत.

दसऱ्याच्या आधीं भाताची कापणी झाली. दिवाळीच्या आधीं मळणी पण आटपली. पडवीवर घातलेली पांच खंडी भाताची रास, वडिलांनीं पायलीला डाव्या मनगटाची आधारणी लावून घाम गाळीत मोजली. त्यांच्या डोळ्यांत आनंदाश्रू उभे राहिले.

"माझ्या बाळक्यानें हाडांचीं काडं केलीं, मातीचे घास खाल्ले, म्हणून आज घर सोन्याचं झालं."

हे त्यांचे त्या वेळचे उद्गार. ते ऐकून, आठ दिवस अन्नाचा कण न मिळालेल्या माणसाला पोटभर लाडू, मोदक घातल्यावर तो जसा सुस्त, मस्त होतो तसा झालों मी.

तोच मी वडिलांचा बाळक्या! पण आज—माझीं पावलं भाताच्या कणगीकडे वळलीं आहेत. आज मला वाटेल तें करून दहीपोहे खायचेच आहेत. मी ओणवा होऊन खांद्यावरच्या पंचाचा एक शेव कणगींतच पसरला आहे. दोन्ही हातांनीं दोन तीन शेर भात मीं त्यांत ओढलें आहे. टोकें एकत्र करून मी आतां त्याची मोटळी बांधणार आहें—

"काका, अहो काका—"

धावत आलेल्या मुकुंदाची हांक. एकाएकीं माझा हात वेंबळ गेला आहे. सगळें घेतलेलें भात परत कणगींत सांडलें आहे.

मुकुंदा कांहीं पाळत ठेवून माझी चोरी पकडायला आलेला नाहीं. त्याला एक मोठें कारिंट सांपडलें आहे अन् त्याच्या पोटांत चार हिरकुटे खोचून त्यानें त्याचा बैल बनवला आहे. आणि ही आपली करामत काकाशिवाय तो आणखी कोणाला दाखवणार?

पण त्याच्या त्या हाकेनें माझ्या पोटांत आवळे शिजले त्याची काय वाट! खरें म्हणजे या चिमुरड्या पोराची मला कसली भीति आहे! पण माणूस दुसऱ्यापेक्षां स्वतःलाच अधिक भितो हेंच खरें. पुनश्च तो प्रयोग करायचा तर आतां जीव धजत नाहीं. शिवाय मुकुंदानें विचारलें 'भात कुठें नेतां?' तर त्याला काय सांगायच! छेः आतां इथून काढता पाय घ्यावा हेंच बरें. कुठें बरें जावें! हात् वेड्या. कुळागरांत झडलेलीं पोफळें तुझी वाट पहाताहेत कीं. घे रोवळी अन् धर वाट!

पाखरांनीं रस चोखलेल्या तांबड्या पोफळांनीं माझी रोवळी भरून गेली आहे. पुरता एक तास लागला हीं सगळीं गोळा करायला. एकेक ओटा उतरत मी आतां वहाळाच्या कडेच्या मागावर येऊन बसलों आहें. परत एवढी चढण चढून घरीं जायचें तर थोडा वेळ विसावा घेणें क्रमप्राप्त आहे.

अरेच्या! पाठीमागून कांकणें कोणाचीं वाजलीं? रमा आली कीं काय? पण नाहीं. ही सुभद्रा आहे. आमच्या घरीं राहिलेलें आपलें मुसळ घेऊन ही घरीं चालली आहे.

"भाऊजी, चला कीं थोडा वेळ आमच्या घरीं!" ती मला म्हणते. तिला नाहीं कसें म्हणूं! कारण तिच्या दृष्टींत स्नेह आहे. 'मी पुढें होतें बरें का' म्हणून ती सटकली आहे. वहाळाच्या दोन्ही दरडींवर आडव्या टाकलेल्या दोन पोफळींच्या वीतभर सांकवावरून किती वेगानें पलीकडे गेली ही! अन् मधेंच तोल जाऊन पडली असती म्हणजे! पण इतकी प्रेमळ अन् सुरेख बाई वहाळांत पडून तिला दुखापत होणें, हा कांहीं देवाघरचा न्याय झाला नसता.

आतां मला मात्र ओढ्यांत उतरूनच पलीकडे गेलें पाहिजे. त्या दोन माड्यांच्या सांकवावरून सुभद्रेसारखाच मीहि निघालों तर खालच्या शेवाळलेल्या दगडाशींच माझी गांठ पडायची. हा लंगडा पाय मला जागो-जाग असा नडतो.

अरे वा! ही तर माझी वाटच पहात उभी राहिली आहे. 'भाऊजी, हातपाय धुऊन घरांत या.' तिचा अगदीं पहिलाच हुकूम. काय करायचें, मानलाच पाहिजे. बायकांचा शब्द आपल्याला मोडवत नाहीं बुवा! अन् त्यांतून सुभद्रेसारख्या...

माजघरांत मांडलेल्या पाटावर मी बसलों आहें. सुभद्रा हातांत पाळ घेऊन माझ्यापुढें ओणवली आहे. दहीपोहे! मला एकदम कसेंसेंच झालें आहे. आजच हिनें मला दहीपोहे कां बरें द्यावे? रमेनें माझी सकाळची मागणी तिखटमीठ लावून हिच्या कानांवर घातली असली पाहिजे. अन् ती ऐकून हीं दयेची देवी अतरांत द्रवली असली पाहिजे. शी:! काय माझें हें जिणें! सत्तेचें घर असून दुसऱ्याच्या मोहबतीचा हा घास खाण्याची वेळ यावी माझ्यावर......! नाहीं सहन होत हें.

"हें काय भाऊजी, उठलांतसे!"

"नको मला. मीं घरीं खाऊन आलों आहें."

"सकाळच्या प्रहरीं पुढें आलेल्या अन्नपूर्णेला लाथाडून जाणार आहांत?"

तिचे हे शब्द माझ्या काळजांत घुसले आहेत. कोणी तरी मारून मुटकून बसवावा तसा मी परत पाटावर बसलों आहें. कापलेल्या वडीसारखें तें पोह्यांवरचें घट्ट दहीं, माझीं आसवें ओथंबून पातळ होत आहे. एकेक घांस मी घशाखालीं लोटीत आहें. ज्याच्यासाठीं धडपडत होतों तें अनायासें मिळालें आहे. आवडीचा पदार्थ; पण मला या वेळीं त्याची चव नाहीं. सुभद्रा कांहीं तरी बोलत स्वैंपाकघराच्या उंबऱ्यावर उभी राहिली आहे. पण ती काय बोलते तें मला कळत नाहीं. शब्द कानावर आदळतात अन्

तसेच माघारे फिरतात. या सगळया बोलण्यांत फक्त एकदोन वाक्यें मला समजलीं आहेत—

“ भाऊजी, मला सगळं माहीत आहे. रमा जाणून बुजून डोळयांवर कातडं ओढते. अन्नदात्याला उपाशीं ठेवते. ”

त्या वाक्यांतल्या सहानुभूतीच्या अर्थांत विरघळत असतांना माझ्या मनांत एक भलताच विचार स्फुरत आहे—

“ रमेच्या ऐवजीं सुभद्रा माझी भावजय झाली असती तर-—”



## ५ : : लागेबांधे

बाहेर अंधार पडला, आंत दिवेलागणी झाली अन् मी तुझ्याकडे जाण्यासाठीं घरांतून बाहेर पडलों. माझ्या घरापासून तुझें गांव चार मैलांवर होतें अन् टीचभर पायवाटेनें मधली टेकडी चढून नि उतरून तिथें पोंचायला दीड तास तरी सहज हवा होता. दोन तास लागले अन् थोडी रात्र झाली तरी मला चालण्यासारखें होतें. तुझ्या दारीं पाऊल टाकतांना लोकांनीं मला पाहूं नये अशीच माझी इच्छा होती.

मी एकटाच नव्हतों. माझ्याबरोबर आणखी एक तरुण होता. मी पुढें अन् तो मागें असे आम्ही चाललों होतों खरे; पण मला त्याच्याकडे एकसारखं वळून पहावें लागे. लहर आली कीं तो मधेंच खुंटासारखा उभा रहायचा अन् 'कां रे?' म्हणून विचारलें कीं नुसता हसायचा. एकदा तर त्यानें माझ्याशीं लगट करून मला म्हटलें.

"नानू ऽ ऽ! कपट......कपट......"

"अरे नाहीं रे बाबा कपट! ... तूं मुकाट्यानें चल पाहूं."

मी त्रस्त स्वरांत उद्गारलों अन् त्याला पुढें लोटलें. आणखी थोडीशी वाट चालल्यावर माझा सोबती एका गुळगुळीत दगडावरून घसरला अन् गडबडला. त्याला सांवरायला जातों तों कंदिल खालीं पडला अन् त्यानेंहि दोन चार कोलांट्या खाल्ल्या. मी त्याला हस्तगत करायला गेलों तर तो

चांगलाच भडकला. त्याची वात कमी करतांना मीं माझ्या सोबत्याकडे नजर टाकली. तो मात्र ठीक होता.

आम्ही टेकडीच्या माथ्यावर आलों. खेळता वारा माझ्या कानाशीं गुणगुणला. आकाशानें क्षितिजाच्या रेषेपर्यंत आपल्या वैभवाचा पसारा दाखवला. चढण चढल्याचे श्रम एका क्षणांत निमाले. धापावणारें हृदय प्रकृतीवर आलें. आतां टेकडी उतरल्यावर खालच्या आंब्या–फणसांच्या राईत बकुळवाडी हें लहानसें गांव अन् उजव्या हाताला सांतेरीच्या देवळा-जवळ तुझें घर.

पण लगेच मनांत आलें कीं, मी जातों आहें खरा; पण तूं घरीं असशील का? अन् असलीस तरी माझें स्वागत करशील का? कारण जेव्हां तूं मला सन्मानानें बोलावलेंस तेव्हां मीं तुझी उपेक्षा केली. आणि आतां तूं मला मनांतून काढून टाकल्यावर आगंतुकासारखा मी तुझ्या घरीं चाललों आहें. खरंच, आतां मी तुला कसें विश्वासांत घेऊं? कसें माझें मनोगत तुला पुरें करायला लावूं? तूं मला मागच्या त्या प्रसंगाची जाणीव करून देऊन कवाड लावून घेतलेंस तर?

मला सांतेरीची पूजा अन् महानैवेद्य करायचा होता. मी सकाळीं नऊ वाजतां ब्राह्मण अन् सवाष्ण यांच्यासह तिथें आलों. तूं देवीचीं उपकरणीं घाशीत होतीस. आम्हांला पाहातांच हातांतलें काम टाकून तूं उठलीस अन् शेजारची पडवी झाडून दिलीस. देवळांत जाऊन वात सारलीस. सवाष्णीनें स्वयंपाक करण्यासाठीं तीन दगड मांडले. लगेच तूं लाकडांचा भारा आणून टाकलास. कच्च्या केळ्यांची भाजी चिरून दिलीस. आमचें भोजन झाल्या-वर सवाष्णीनें तुला पान वाढून दिलें तें देवळाच्या मागच्या बाजूला नेऊन तूं जेवलीस.

आम्ही घरीं जातांना उरलेलें शिधापाणी तुझ्या स्वाधीन केलें. मीं वर तुला एक रुपया दिला. त्या वेळच्या तुझ्या चर्येवरून मला वाटलें कीं, या अल्पशा देणगीचेंच तुला ओझें झालें आहे. तूं माझ्यापुढें उभी होतीस;

पण अर्धतनु खांबाआड लपवून. तुझ्या मुखांत विडा रंगला होता. ओठा-वरची लाली गालांवर प्रतिबिंबित झाली होती. डोळयांच्या मासोळया मद्‌भरी दिसत होत्या. वस्तुतः तुझ्यासारखीच्या मुद्रेवर अशा भर जवानींत नखरा नाचायला हवा होता. पण मी तर तिथें विनय खुललेला पाहत होतों. मला वाटलें, तुझ्या जातीचे रंगढंग कधीं शिकणार तूं? तुझी आई जिवंत असती तर तिनें अशा या मुग्ध वृत्तीबद्दल तुला चांगलेंच धारेवर धरलें असतें. " ठीक चाललें आहे ना तुझें?" मीं तुला सहज म्हणून विचारलें.

"तुमच्यासारख्यांचे पाय घराला लागत नाहींत, ठीक कसलं असा-यचं?" तूं अगदीं अनपेक्षित उत्तर दिलेंस अन् तेंहि फक्त मलाच ऐकूं जावें अशा बेतानें.

मी हसलों अन् मनांत म्हटलें, 'देवळाची भाविण तूं—तुझ्या घरीं मीं यायचं? म्हणजे झालं. आमचं कुलशील, घराण्याचा लौकिक, सगळंच्या सगळंच चुलींत जायचं.'

आणि त्यानंतर कांहीं महिन्यांनीं देवीची जत्रा आली होती. मोचे-माडकरांचा दशावतारी खेळ होता. शेंकडों लोक देवळापुढच्या अंगणांत दाटीनें बसले होते. 'खाज्या'च्या दुकानापुढें मंडपघसणी झाली होती. बसलेल्या जनसंमर्दाच्या भोंवतीं जें एक उभ्या लोकांचें दीर्घ वर्तुळ बनलें होतें त्यांत मीहि माझ्या दोघां मित्रांसह सामील होतों. मंडपांतले गॅसचे दिवे, घन अंधकार उजळण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करीत होते. आणि त्या प्रकाशांत तूं देवीची आरती घेऊन गर्दीतून हिंडत होतीस. लोक प–पैसा तिच्यांत टाकीत होते. तुझ्या कमाईची रात्र उगवली होती. मी मित्रांबरोबर गोष्टी करण्यांत रंगून गेलों होतों. तशांत तूं अचानक माझ्या-पुढें येऊन उभी राहिलीस. मी एकदम चपापलों.

आरतींतल्या नीरांजनाचा तुझ्या उजव्या गालावर अधिक प्रकाश पडला होता अन् तूं अंबाड्यांत माळलेल्या अबोलीच्या वेणीची एकच बाजू डोळयांत भरत होती. पलीकडे थोड्या अंतरावर एक तरुण त्रिकूट

उभें होतें. त्याच्या अंगावर तुझी सावली पडली होती आणि तेवढ्यानेंच त्यांच्या आंबटशोकी वृत्तीला गुदगुल्या होत आहेत हें मी पाहत होतों. अवघ्या एका हाताच्या अंतरावर समोरासमोर आपलीं तोंडें अन् मधें ती मंगलारती. कसली तरी अननुभूत सुखसंवेदना माझ्या हृदयांत चमकून गेली. तूं माझ्या डोळ्याला डोळा भिडवला होतास. ओष्ठदलें न हालवतां तूं मला विचारीत होतीस.

“ मी त्या दिवशीं तुम्हांला एवढं बोलावलं. एकदासुद्धा यावंसं वाटलं नाहीं ना ? ”

मी भानावर आलों तो मित्राच्या कोपरखळीनं. मला तो प्रकार असह्य झाला. मीं खिशांतून एक पावली काढून तुझ्या आरतींत टाकली. तें एकुलतें एक पांढरें नाणें आरतींतल्या तांबड्या नाण्यांवरून घरंगळत नीरांजनाच्या पायाशीं जाऊन पडलें. लागलीच मी तोंड फिरवून गर्दींत अदृश्य झालों.

पण त्या रात्रीं तुला पाठमोरा होणारा तोच मी आज अंधारांतून दगड-धोंडे तुवडीत टेकडी उल्लंघून तुझ्याकडे चाललों आहें. चालतां चालतां तें ओळखीचें वडाचें झाड दिसलें अन् मीं म्हटलें, ‘ किती झपाझप खालीं आलों आपण ! ’ मी आणखी थोडा पुढें जाऊन थांबलों. सोबत्याकडे पाहून नाकावर बोट ठेवलं. कंदिलाची ज्योत अगदीं बारीक केली आणि थोडा वेळ कानोसा घेतला.

सद्दू लोहाराच्या खोपींतले घणघाव आतां थांबले होते. बाळग्या मेस्तार्ची ‘ विन्नं–कुट्टी ’ ची ‘ ठोक् ठोक् ’ बंद पडली होती. पेद्रू किरिस्तांवाच्या गुत्त्यांत या वेळीं खरें म्हणजे गलगा असायचा अन् एखादा इष्कबाज मद्यपी, मद्यानें भरलेली करटी हातांत घेऊन लुळी जीभ, वांकलेली कंबर अन् पायाचा तिढा अशा पवित्र्यांत झोकांड्या खात एखाद्या शृंगारिक लावणीचा चरण घोळवतांना ऐकूं यायचा—

**पुन्या शेहरामधिं तुला पाहिलं गोरां तुझां अंग–पोरि ग !**

पण त्या दिवशीं ती बाजूहि शांत होती. एकूण मला ग्रह अनुकूल होते. आम्ही एका कुंपणाच्या बाजूबाजूनें पुढें झालों अन् दबत्या पावलांनीं तुझें घर गांठलें. तुझ्या अंगणांत परसा पेटलेला होता अन् एक कुळवाडी कुड्याच्या पानाच्या जाड अन् लांबट विडीचे झुरके घेत तिथें शेकत बसला होता. रॉकेलचें पेटतें टमरेल पुढें ठेवून तूं त्याच्याशीं गोष्टी करीत होतीस.

मला पहातांच 'आगे बायेऽऽ!' म्हणून तूं उठून उभी राहिलीस अन् चटकन् घरांतली शेंद्री घरापुढच्या चिंचोळ्या ओसरीवर पसरलीस. नेसलेलें उभें तोकडें जुनेर गुडघ्यापर्यंत ओढतांना अन् फाटक्या पदरानें उराची काळजी घेतांना तुझी झालेली धांदल मला गंमतीची वाटली. तूं लागलीच आंत पळालीस. जातांना दाराआड उभें राहून हुकमी आवाजांत परशा-जवळ बसलेल्या त्या कुळवाड्याला म्हणालीस.

"येशा! तूं जा आतां घरीं. थाऊर रात जार्ली." त्यानं 'बरां बाय्' म्हटलं अन् तो काळा गडी अंधारांत दिसेनासा झाला.

आम्ही दोघे ओटीवर बसून राहिलों. थोड्याच वेळांत तूं दाराशीं येऊन खूण केलीस. मी उठलों. माझ्याबरोबर तोहि उठला. मी त्याला हात दाबून खालीं बसवलं. तो चवताळला.

"नानू! कपट...कपट...हें सगळं कपट आहे. मी ओळखतों तुला–" असं तो अद्वातद्वा बोलूं लागला. घसा खरखरवीत अवाच्या सवा अंगविक्षेप करूं लागला. मी हळूच जाऊन त्याच्या कानांत कुजबुजलों.

"गप्प बैस. नाहीं तर सावज निसटेल."

मात्रा लागू पडली. तो एकवार खांकरून 'थूः थूः' करून थुंकला अन् परशाजवळच बसून राहिला. मी आंत गेलों. तूं माझ्यापुढें उभी राहिलीस. किती झटकन् तूं वेशभूषा बदलली होतीस! चुण्या पडलेलं जुनेंच लुगडें पण तें तुझ्या पायांत घोंटाळत होतें. पाठीवर एक पदर मोकळा रुळत होता. केसांनीं कान झांकून टाकले होते अन् नाजूक लवलवत्या पाळीच

तेवढ्या मोकळया राहिल्या होत्या. मागच्या दारीं फुललेल्या अबोलीचा एक तुरा तूं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत माळून आली होतीस अन् बुच्चे कान नि उघडा गळा यांमुळें झालेली तुझ्या सौंदर्याची हानि तो तुरा भरून काढीत होता.

मी खालीं बसतांच तूंहि थोड्या अंतरावर मांडी मोडून बसलीस. कोंपऱ्यांतलें कांठफुटकें लांकडी पाळं तूं जवळ ओढलेंस. त्यांत सुपारी होती; पण अडकित्त्याचा पत्ता नव्हता. चुनाळाचें वरचें झांकण कुठें तरी चरायला गेलें होतें अन् आंतला चुना वाळून त्याची विरी गेली होती. तुझ्या हाताला सुकून सुरळया झालेलीं जीं दोन पानें लागलीं त्यांना तूं आपल्या गाडस हातानें मागें भिरकावून किती कठोर शिक्षा दिलीस! अन् लगेच माझ्याकडे पाहिलेंस तेंहि किती केविलवाण्या नजरेनें!

" असे कसे अचानक आलांत तुम्ही! अगोदर थोडीशी सूचना दिली असतीत तर मीं विड्याचा सगळा सरंजाम करून नसता का ठेवला? माणसानं असं दुसऱ्याला लाजवायचं हें चांगलं का?" हा तुझ्या अंतरांतला भाव मला त्या दृष्टींत स्वच्छ दिसला.

"जाऊं दे. मी विडा खात नाहीं. तूं उगीच मनाला कष्ट देऊं नकोस." मी म्हटलें. त्यावर तूं मानेला जी एक नाजुकशी लचक दिलीस त्यांतला लाडिक आशय मी समजलों तो हा कीं, 'चला, बोलूं नका माझ्याशीं!'

"हें पहा, माझ्याबरोबर एक माणूस आला आहे..."

" पाहिला आहे मीं. मी देतें त्याला बाहेर चटई अन् घोंगडी."

"अं हं! त्याला आंत बोलवायचा आहे."

"हें काय बोलणं झालं? त्याला कसा आंत घ्यायचा बाई!"

" त्यालाच आंत घ्यायचा. त्याची तुझी गांठ घालून देऊन मी बाहेर जाणार आहें–"

" म्हणजे?"

" सांगणं जरा चमत्कारिक आहे! पण नाइलाज आहे...तो माणूस वेडा आहे. कसला जवान गडी! किती गुणी! पण आजमितीला फुकट गेला आहे. डॉक्टर-वैद्य म्हणतात कीं, कामविकृति आहे. दाबून दडपून टाकलेल्या वासना अनावर होऊन शेवटीं डोकं फिरण्यांत त्याचं पर्यवसान झालं आहे. तो जे चाळे करतो त्यावरून डॉक्टरांचं म्हणणं खर वाटतं. पण वाटून उपयोग काय? कोण मुलगी देणार अशा माणसाला? वेड गेल्याशिवाय लग्न होत नाहीं अन् लग्न झाल्याशिवाय वेड जात नाहीं अशी चक्रापत्ति आहे ही. या आपत्तींतून सुटायचा एक मार्ग म्हणून मीं आज त्याला तुझ्याकडे आणला आहे. तूं याला कांहीं दिवस संभाळ..."

माझा हेतु मीं तुला स्पष्ट शब्दांत सांगितला. तूं खांद्यावर गाल टेकून खालीं पाहूं लागलीस. भरून आलेले डोळे एकवार रिते केलेस. पातळ नाकपुड्यांतून सोडलेल्या दीर्घ निःश्वासानें आपली निराशा प्रकट केलीस. तुझ्या उत्तराची वाट पाहतांना जाणारा प्रत्येक क्षण मला घटकेसारखा वाटला.

" ...कस्तुर! तुला संकट पडलं आहे हें मी जाणतों. पण नाहीं म्हणूं नकोस मला. हा वेडा माझ्या मावशीचा मुलगा. एकुलता एक. ती याला घेऊन काल माझ्याकडे आली नि धाय मोकलून रडली. कसंहि कर; पण याची कुठेंतरी सोय लाव. त्यानें तरी बरा होतो तर होऊं दे. जी माझ्या मुलाला माणसांत आणील तिचे पाय धुईन मी ' असं मला म्हणाली. तेव्हां विचार कर. हा बरा झाला तर एक घर उभं होईल."

पण तरीहि तुझ्या तोंडून शब्द निघेना. एकवार माझ्याकडे नजर टाकून तूं परत मान खालीं घातलीस. मला ती स्तब्धता असह्य झाली. तुझा मूक नकार कळून चुकला.

" किती विश्वासानें आलों होतों मी! म्हटलं, तूं माझं ऐकशील. माझ्याकरतां एवढं करशील. मी तुला विसरलों नसतों कस्तुर ...बरं आहे. येतों मी!"

मीं उठण्यासाठीं टोपी डोक्यावर ठेवली अन् कंदील मोठा केला.

" थांबा. कशाहि कारणासाठीं का होईना; पण पहिल्यांदा माझ्या घरीं आलांत ते असे रागावून जाऊं नका. मला तुमची आज्ञा मान्य आहे."

मी प्रथम स्तंभित झालों अन् नंतर आनंदानें हसलों. त्या दीपज्योतीच्या प्रकाशांत वर झालेलें तुझें मुखमंडळ मला किती उज्ज्वल दिसलें! कसलें तेज एकाएकीं प्रकटलें होतें तिथें! त्यागाचें, प्रेमाचें का दोहोंचेंहि? मला वाटलें, दोन पावलें पुढें टाकावीं, दोन्ही हात लांब करावेत अन्...

बोला-बुद्धीला जेवढी कृतज्ञता व्यक्त करतां आली तेवढी करून मीं तुझा निरोप घेतला अन् सांतेरीच्या देवळांत येऊन पडलों.

दुसऱ्या दिवशींच्या बाजाराला मी स्वतः तालुक्याच्या गांवीं गेलों. तुझें दैन्य माझ्या डोळ्यापुढें होतें. तुझ्या कांतीला खुलतील अशा रंगाचीं दोन लुगडीं, दोन चिटें अन् एक मिठाईचा पुडा या वस्तू मीं खरेदी केल्या. गड्याच्या हातून त्या तुझ्याकडे पोंचवतांना दहाच्या पांच नोटा लुगड्याच्या घडींत कोंबायला मी विसरलों नाहीं. मला वाटलें, 'केवढा उदारांचा राणा आहें मी!' पण लगेच अंतर्नाद उठला. 'कस्तुरच्या त्यागापुढें तुझें दान म्हणजे कोणत्या झाडाला पाला!'

मी येत्याजात्याकडे चौकशी करीत होतों. वेडा दिवसभर आजूबाजूच्या गांवांतून भटकत होता. कोण कांहीं घालील तें खात होता अन् सूर्य मावळण्यापूर्वी तुझ्या ओटीवर हजर होत होता. वेडा खरा; पण ठरल्या वेळीं तुझ्याकडे येणें हें त्याला कळत होतें. एक दिवस दुपारीं स्वारीचा फेरा आमच्या घराकडे आला. त्या वेळीं किती वेगळा दिसला तो मला! त्याच्या वाढलेल्या केसांतला खंडीभर चिखल धुऊन निघाला होता. काया निर्मळ दिसत होती. कपडेहि स्वच्छ झाले होते. मीं त्याला विचारलें.

" बाबल्या! तुला कोणीं रे धुऊनं काढलं? कस्तुरनं का?"

एक लाजाळू स्मित करून त्यानें नंदीसारखी मान हालवली. मीं मनांत म्हटलें, 'कुणासाठीं तूं करतेस हें? माझ्यासाठीं, याच्यासाठीं, का स्वतःची अभिरुचि संभाळण्यासाठीं?'

ही एक आपत्ति मीं तुझ्यावर लादलीच होती अन् तिच्यांतूनच पुढें दुसरी उद्‌भवली. वेडा तुझ्या घराकडे कोणालाहि फिरकूं देईना. कोणी कसल्याहि कामासाठीं आला तरी त्याला वाटायचें कीं, हे लोक तुझ्यासाठींच येत आहेत. मग तो दिसेल त्याला शिव्या देऊं लागायचा.

त्यामुळें गांवकरी चिडले. त्यांनीं एक दिवस वेड्याला यथेच्छ बडवलें. पण तो रडत कण्हत येऊन पडला तुझ्याच दारीं! मुक्या मारानें ठायीं ठायीं सुजलेल्या त्याच्या अंगाला तूं हळद–मिरीं वाटून कढत लेप दिलास. चार दिवस लागले त्याला बरें व्हायला. तो जेव्हां पुनश्च गांवांत हिंडायला लागला तेव्हां तूं मुख्य गांवकराला हात जोडून विनवलेंस.

“वेडा आहे तो. त्याला कांहीं कळत नाहीं. तुम्ही त्याला तोंडानें बोला. हवा तेवढा धाक दाखवा. पण हात मात्र लावूं नका. वेड्याला मारणं—”

पण तुझें कोणीं ऐकलें नाहीं. ‘तूं या वेड्याला घेऊन मिरवतेस, ते गांवांतले ‘गाउणगे’ काय नामर्द झाले? बऱ्या बोलानें याला सोडून दे!’ म्हणून तुलाच सर्वांनीं दमदाटी केली आणि तूं ऐकलें नाहींस म्हणून मग सर्वांनीं जणूं तुला वाळींत टाकलें. गांवकऱ्यांनीं तुला देवळांत जायला बंदी केली. तुझ्याशीं आयाबायांचें बोलणें चालणेंहि वर्ज्य झालें. कोणीहि तुझ्या उपयोगी पडेना.

चौकशी करतां करतां या सर्व गोष्टी मला समजल्या. मी विचार करूं लागलों, ‘वेड्याला आतां तुझ्याकडून सोडवलाच पाहिजे. पुरे झाला हा तुझा छळवाद! त्याचं डोकं ताळ्यावर येण्याऐवजीं तुला मात्र वेड लागायचं. प्रसंगीं गळ्यावर सुरी—’

मीं त्याच्या आईला निरोप सांगून पाठवला. ‘बावल्या सुधारण्याचें लक्षण नाहीं. मी त्याला दोन चार दिवसांत घरीं पोंचता करीन.’

ज्या दिवशीं मीं हा निरोप पाठवला त्याच दिवशीं करकरीत तिन्ही-सांजा येशा गडी घाबऱ्याघुबऱ्या माझ्याकडे आला. मी गुरांना गोठ्यांत

बांधून अन् दुभत्या गायींच्या धारा काढून नुकताच मोकळा झालों होतों. येशाचें आशा वेळीं येणें हें मला भयसूचक वाटलें.

" काय रे येशा ! कशाला आलास ? "

" तुम्हांला कस्तुरनें असाल तसे बोलावलं आहे. "

" काय झालं रे ? "

" वेड्यानं तिच्या घरीं उच्छाद मांडला आहे. "

" ...?... "

" कसं अन् काय तें विचारीत बसूं नका दादा—वाटेंत सगळं सांगतों तुम्हांला—"

मीं लगेच कपडे घातले. एका हातांत कंदील अन् दुसऱ्या हातांत सोटा घेऊन घराची पायरी उतरतांना मी बायकोला एवढेंच म्हटलें. ' मी जाऊन येतों हं ! माझी वाट पाहूं नकोस. रात्रीं सोबतीसाठीं 'राखण्या'ला ठेवून घे. '

वाटेनें चालत असतांना येशा सांगूं लागला—

" सगळं गांवच फिरलं आहे कस्तुरवर. अन् आज वेडाहि उलटला. गांवांत एक दोघे म्हातारे ' बरं मागते ' आहेत तिचे. वेडा तिथें नाहीं असं पाहून ते आज संध्याकाळीं तिला ' हिताची बुद्ध ' सांगण्यासाठीं आले होते. माजघरांत बसून तिघांच्याहि गोष्टी चालल्या होत्या. इतक्यांत वेडा तिथें उपटला. त्यांना पाहतांच त्याचं माथं भडकलं. लगेच वईचा एक खुंट काड्दिशीं मोडून त्यानें हातांत घेतला. आग ओकणारे ते डोळे अन् हातांत उगारलेला तो खुंट ; हा त्याचा अवतार पाहून त्यांची छाती हबकली. बिचारे आपल्या कांबळी टाकून मागच्या दारानें कसेबसे पसार झाले."

" ते पळाले तसा तो मग कस्तुरच्या अंगावर धावला. ' तूं रांडे त्यांना सामील आहेस. मला मारायचा कट करते आहेस. थांब, तुझा ' फोंड 'च भरतों....' त्यानें घाव घातला. पण कस्तुरनें तो चपळाईनें चुकवला. त्यासरशीं झडप घालून त्यानें तिचा हात पकडला अन् त्याला कडकडून चावा घेतला. तो जेव्हां दंश सोडीना, तेव्हां कस्तुरनें सारी ताकद एकवट

करून त्याच्या पोटकुळांत लाथ हागली. ती लाथ वर्मावर बसली असावी. कारण तो कळवळला अन् तडमडत खालीं पडला. "

" कस्तुर बाहेर आली अन् तिनें दाराला बाहेरून कडी लावून घेतली. मी तिथें अचानक पोंचलों. ती मला म्हणाली, ' मागचें दार चटकन् बंद करून घे. ' इतक्यांत तो उठून दाराला धडके देऊं लागला होता. तें जेव्हां कांहीं केल्या उघडेना तेव्हां तो चौपदरी गळे काढूं लागला. दाराला डोकेंहि बडवून घेतलेंन्. पण तरीहि जेव्हां कोणी कडी काढीना तेव्हां त्यानें निराळाच मंत्र सुरू केला. घरांतून धपाधप आवाज येऊं लागले. मीं म्हटलें, कस्तुरच्या गाडग्यामडक्यांचा खुर्दा झाला आज. ' टरटराट ' ऐकून कस्तुर म्हणाली, " चिरगुटांचा सत्यानाश केला यानें. "

" पण तरीहि आम्हांला दार उघडायचा धीर होईना. म्हटलें, हा देवचार बाहेर आला कीं नरडेंच फोडील आमचें. बाहेर किती तरी ' झिलगे ' गोळा झाले होते. पण एकटा ×××× पुढें येईना. सगळे दांत काढून हंसत होते. त्यांना मनांतून बरें वाटत होतें. जेव्हां सगळ्यांनींच असा अंत पाहायचें ठरवलें तेव्हां कस्तुर मला म्हणाली.

" आतां धाव बाबा दादांच्याकडे. त्यांना घेऊन ये ताबडतोब ! "

येशानें जेवढी हकीगत सांगितली तेवढीच माझा जीव आधणांत टाकायला पुरेशी होती. आणि मला वस्तुस्थितीचें साक्षात् दर्शन घ्यायचें होतें. मीं कमालीच्या वेगानें तुझें घर गांठलें. तूं बाहेर उभी होतीस. मीं तुला विचारलें,

" अजून आंतच आहे का तो ? "

तूं म्हणालीस, ' हो ! '

मीं कडी काढून दार आंत लोटलें. तो गुडघ्यांत तोंड खुपसून बसला होता. मला पाहतांच तो उठला तो खवळूनच. ' तूं मला मारायला या

सांपळयांत आणून घातलेंस. हराम आहेस तूं. अन् ही रां–' तो तोंडाला येईल तें बोलूं लागला.

" मुकाट्यानें बाहेर हो. वटवट नको उगीच. "

" काय करशील रे तूं? मला मारणार? मार. घे माझा प्राण, दाब गळा. हा मीच असा दाबून घेतों हवा तर. "

मीं येतांनाच उसगींचा एक लवलवीत फोक तोडून घेतला होता. तो जेव्हां असा अक्रस्ताळीपणा करायला लागला तेव्हां त्याच्या पायाच्या पोटरीवर मीं दोन सपासप आवाज काढले. तो चळचळला. 'अयायी ऽऽ!' करून विवळला. ' नको रे मारूं ' म्हणून गयावया करूं लागला. मीं म्हटलें.

" हो चालता इथून. कर तोंड काळं. नाहीं तर बसली बघ दुसरी. "

त्यानें एकाच उडींत उंबरा ओलांडला अन् पळ काढला. मी त्याचा पाठलाग करीत वाटेपर्यंत गेलों. अंधारांत त्यानें कुठें दडी मारली मला कळलें नाहीं. थोडा वेळ कानोसा घेऊन मी परत आलों अन् तुझ्या घरांत शिरलों. तेवढ्यांत तूं घागरीचे अन् मडक्यांचे विखुरलेले तुकडे गोळा करीत होतीस. कपड्यांच्या धांदोट्या जमवून कोपऱ्यांत फेकीत होतीस. त्या 'भीकमाग्या'नें ज्या तुझ्या लुगड्याचीं लक्तरें लोंबवलीं होतीं तें मीं तुला दिलेल्यापैकीं होतें. तूं तें हातांत घेतलेंस अन् चित्रासारखी स्तब्ध झालीस. मला वाटलें कीं, तुला म्हणावं.

" कस्तुर ! कां एवढी कष्टी होतेस? असलीं एक सोडून दोन लुगडीं देईन मीं तुला ! "

पण शब्द निघाले नाहींत. तुझा तो विसकटलेला, भग्न झालेला संसार अन् मनगटाला गुंडाळलेली ती चिंधी पाहून माझा मीच शरमलों होतों.

तूं केर काढलास अन् चटई टाकलीस. मीं बसलों अन् तुलाहि ' बस ' म्हटलें. तूं भिंतीला टेकून बसलीस. खरेंच, तुझ्या विकल कायेला त्या वेळीं आधार हवा होता. थोडा वेळ तूं मुकी अन् मीं स्तब्ध !

" कस्तुर ! सुखानें जाड–पातळ पेज खाऊन तूं या घरट्यांत रहात होतीस. मीं हें ग्रहण तुझ्यामागें लावलें. " मीं म्हटलें.

" तुम्ही कसलें ? माझ्या दैवानें. तुम्हांला तरी काय, असें होईल हें स्वप्न पडलें होतें– ? "

आणि पुनश्च दोघेंहि गप्प ! असा थोडा वेळ गेल्यावर शेवटीं मीं तुला विचारलें.

" बरें आहे. जाऊं मी आतां झोंपायला ? "

" कुठें ? "

" सांतेरीच्या देवळांत. "

" अन् मला कोण इथें ? रात्रीं बेरात्रीं तो परत आला तर माझी वाट काय ? ... "

ते शब्द उच्चारतांना तुझें सर्वांग किती शहारलें ! मीं जातों म्हटलें त्याचा एकाएकीं मला पश्चात्ताप झाला. मी पाप–पुण्याला भीत होतों म्हणण्यापेक्षां जनापवादाला भीत होतों. तुझ्या घरून मला पळ काढायचा होता तो त्याचसाठीं. माझ्या काल्पनिक भयापुढें, तुझ्या वास्तव भयाकडे माझें लक्ष गेलें नाहीं. माझ्या अंतरांतली ' कातडी बचावू ' वृत्ति अशा प्रकारें पुढें आली त्याबद्दल मला खेद झाला.

मीं कपडे काढले, कंदील मालवला अन् चटईवर आडवा झालों. घरांत काय दुपारचें होतें तें पाण्याच्या घोटाबरोबर गिळून तूंहि अंथरुणावर अंग टाकलेंस. नेहमीं पाठ लागली कीं झोपेनें मला घेरायचें; पण आज ती माझ्यावर रुसली होती. अंधारांत आपण एकमेकांना दिसत नव्हतों ; पण हालचालींवरून दोघेंहि जागीं आहों हें एकमेकांना कळत होतें. मीं माझे विचार सोडले अन् तुझ्या मनाची चाहूल घेऊं लागलों. काय बरें चाललें असावें तिथें ?

सुमारें दीड तासानें वेडा दूर कुठें तरी ओरडत असल्याचें कानावर

आदळलें. 'अरेच्या–' असें मी म्हणतों तोंच अकल्पितपणें माझ्या अंगाला दोन हातांचा विळखा बसला.

" कस्तुर...हें काय करतेस तूं ? "

" मला भीति वाटते मालक... ! "

सकाळीं उठून मी वेड्याला त्याच्या गांवीं पोंचतें केलें. एका दुर्धर, दुस्सह प्रकरणावर पडदा पडला म्हणून मीं त्या दिवशीं सुटकेचा श्वास सोडला.

पण तो पडदा एका अंकाचा होता. नाटक अजून पुढें चालायचेंच होतें हें मला आणखी चारच दिवसांनीं समजलें. त्या दिवशीं मीं सुपारीचें पाडप केलें होतें. गळ अन् शिंपटीं यांची रास कुळागरांतून घरीं आणीपर्यंत दुपारचा एक वाजून गेला होता. त्यानंतर चार कळशा डोक्यावर ओतून मीं हातातोंडाची गांठ घातली होती. आतां थोडा वेळ स्वस्थ वामकुक्षी करायची, या विचारानें पंचाला हात पुशीत मी पडवींत यायला अन् दारांत तूं दिसायला एकच गांठ पडली.

मी दिसतांच तूं जमिनीवर पालथी पडलीस अन् दोन्ही हातांनीं तोंड झांकून स्फुंदूं लागलीस. इतक्यांत माझीं मुलें तिथें गोळा झालीं. हातांतला घास टाकून बायकोहि बाहेर आली.

" भर दुपारीं ही कोण आवदसा आली माझ्या नांदत्या घरांत रडायला ? " तिनें म्हटलें.

मीं तिच्याकडे पाहून डोळे मोठे केले. तुझा तो आक्रंद मला ऐकवेना अन् त्या सुकुमार देहाची ती अशरण अवस्थाहि पहावेना. छे ! कांहीं तरी भयंकर घडलें होतें खास ! पण काय तें ?

" कस्तुर ! उठून बैस पाहूं आधीं. रडं थांबव अन् सगळं काय तें मला सांग. "

तूं उठून बसती होतांना व्याकुळ उद्गार काढलेस. ' सगळा सत्यानाश झाला हो माझा— '

आणि मग उमाळे आवरीत एकेका तुटक वाक्यानें तूं मला जी हकीकत सांगितलीस ती ही—

मीं गांवीं पोंचवलेला वेडा चार कोस वाट चालून अचानक सकाळीं तुझ्याकडे आला होता.

तूं घरीं नसतांना त्यानें तुझ्या घराला आग लावली होती. तुला एक बोटभर चिंधीसुद्धा घरांतून बाहेर काढायला मिळाली नव्हती. सर्वस्वाचा होम झाला होता. निजाचें आश्रयस्थान कोसळून पडलें होतें. एका नेसत्या वस्त्राशिवाय तुझ्याकडे तुझें असें कांहींच उरलें नव्हतें आणि आतां गत्यंतर नाहीं म्हणून निर्वाणीं तूं माझ्याकडे धाव घेतली होतीस.

शेवटीं मीं तुला विचारलें.

"कस्तुर ! झालें गेलें तें परत येत नाहीं. आतां पुढचा विचार सांग."

"पुढचा विचार !...?...मिळाला तर तुमच्या पायांचा आसरा नाहीं तर नदीची भरलेली कोंड—!"

तूं अशी आत्मत्यागाच्या सीमेवर आलेली पाहून माझ्या यातना शतपट वाढल्या. तुला घरांत ठेवून घेणें म्हणजे सामाजिक पाप अन् बाहेर घालवणें म्हणजे माणुसकीचा घात. तुला घरांत बाळगली तर बायको, शेजारी, नातेवाईक, सगळे सगळे डोक्यावर घेतील मला. 'माणसांतून उठला.' 'घराचार बुडवला.' म्हणून लोक माझी कूट खातील. आणि तुला 'जा' म्हणणें म्हणजे...! हरिणीला अर्धमेली करायची अन् लांडग्याच्यापुढें टाकायची.

काय करूं मी ? स्वीकार का धिक्कार ? विचारांचीं उलटींसुलटीं आंदोलनें सुरू झालीं. दोनच क्षण; पण ते कसाला लावणारे होते. कांहीं तरी निर्णय घेणें आवश्यक होतें.

तसा तो मीं घेतला अन् बायकोला म्हटलें.

"ऐकलेंस ? कस्तुर आतां आपल्या घरीं रहाणार आहे. जन्मभर... निदान तिची इच्छा आहे तोंवर !"

तिनें माझ्याकडे अशी नजर रोखली कीं, 'तुम्हीच का हें सांगतां मला ? कमरेचें सोडून डोक्याला का गुंडाळलेंत ?'

पण मीं त्या नजरेची पर्वा केली नाहीं. मला आतां डळमळीत राहून चालणार नव्हतें. प्रश्न कर्तव्याचा होता. प्रश्न प्रेमाचा...हो, मनाची प्रतारणा कशाला करूं ? तूं माझें मन जिंकलें होतेंस !

" अशी बघत राहूं नको. घरांत असेल तें तिला वाढ. भुकेनें तिचे प्राण कंठाशीं आले आहेत. "

नंतरचे कांहीं दिवस आपल्याला अस्वस्थतेचे गेले. घर हें घर उरलें नाहीं. मी तुझ्याकडे मनमोकळें बोलूं शकत नव्हतों. बायको माझे कळ-वळ्याचे बोल ऐकायला तयार नव्हती. तूं बावरली होतीस. कांहीं तरी निमित्त काढून घरीं बसायला आलेल्या शेजारणींच्या कुजक्या शब्दांनीं व्याकुळली होतीस. गांवांतल्या म्हाताऱ्याकोताऱ्यांनींसुद्धा त्या चार दिवसांत माझ्या घरीं पायधूळ झाडली होती. 'अभक्ष्य भक्षून वर गळ्यांत हाडूक बांधून मिरवणारा' म्हणून गांवांत माझी संभावना चालली होती.

बायको सदैव फुस्कारत होती. गोळाभर अन्नाचें पान धप्‌दिशीं तुझ्या पुढ्यांत आपटीत होती. पण सुदैव एवढेंच होतें कीं, तूं तोंडांत गुळणी घेतली होतीस. असा एकेक दिवस मागें पडूं लागला. प्रथम माझीं मुलें तुला बिलगलीं. घरांतला तुझा परकेपणा कमी होत चालला. तूं ऐतखाऊ राहिली नाहींस. पट्टराणीचा रुबाब आणला नाहींस. तुझे हात माझ्या घरांत, गोठ्यांत अन् कुळागरांत राबूं लागले.

आतां बायकोला सकाळीं उठून गोठाभर शेण गोळा करावें लागत नसे. तूं भरलेली पाटी तुझ्याच डोक्यावर चढवायला हात लावला कीं तिचें काम भागे. त्याच पाटींतून कुळागरांत झडलेलीं पोफळेंहि घरीं येत. रात्रीं जेवणें झाल्यावर झाकापाक करून बायको माडीवर येते तोंच दोन स्वच्छ शय्या सुसज्ज अंथरलेल्या तिला दिसूं लागल्या. दिवसेंदिवस तुझी उपयुक्तता तिला पटूं लागली.

सेवावृत्तीनें तूं तिला जिंकलेंस. तितिक्षेनें तिचा फुंफाट कमी केलास. लव्हाळी होऊन तिच्या डोळयांतली आग शमवलीस. अन् मला कांहींच करावें लागलें नाहीं !

त्यानंतरच्या उन्हाळयांत माझा एक बेळगांवाला राहाणारा मामा घाट उतरून खालीं आला होता. गरे, आंबे यथेच्छ खातांना मलाहि चार कान-पिचक्या द्याव्या असा दुहेरी हेतु त्याच्या मनांत होता. शक्य तर आपल्या वडीलकीच्या आधारावर, माझ्या बायकोचा कैवार घेऊन तो मला बजावणार होता. ‘ नानू ! या सटवीला आधीं घरांतून काढ. लक्ष्मीसारखी बायको मिळवून दिली तुला अन् तूं तिच्या उरावर या अवद्सेला नाचवतोस ? शरम नाहीं वाटत ? ...’

पण मला सुनावण्यासाठीं त्यानें तयार केलेलें हें वीररसपूर्ण व्याख्यान बिचाऱ्याला आंतल्या आंत जिरवावें लागलें.

कारण—

मामंजी आलेले पाहून त्यांचा परामर्श घेण्यासाठीं बायकोनें कस्तुरला एक भाजीचा मोठा फणस तोडायला लावला होता. ओटीला लागून असलेल्या दक्षिणच्या पडवींत तुम्ही दोघी एकत्र आलां होतां. बायको विळी घेऊन कच्चे गरे काढण्यासाठीं बसली होती अन् तूं चिकानें लपटलेली कुऱ्हाड घेऊन फणसावर घाव घालण्याच्या पवित्र्यांत उभी होतीस.

पण तो फणस कसला वस्ताद ! तूं नाजूक हातानें घातलेला घाव निसटता चुकवून त्यानें सरळ अंगणांत उडी मारली. बिचाऱ्या जमिनीला मात्र नाहक शासन भोगावें लागलें. त्या प्रकारानें तुला हसूं आवरेना.

“ हसतेस काय ? कुऱ्हाड पायावर बसली असती म्हणजे ? ” बायको तुला म्हणाली.

“ पायावर बसली असती तरी चाललं असतं. पण तुम्ही सकाळींच स्वच्छ सारवलेल्या जमिनीला खड्डा पडायला नको होता. ”

" शहाणी आहेस. तुझा पाय मोडला असता म्हणजे काजू–भिरंडांच्या ऐन हंगामांत संसाराची कशी दुर्दशा झाली असती ! अन् वर हें लंगडं घोडं हातीं धरून मला चालवावं लागलं असतं. "

बायकोच्या आंबटगोड शब्दांनीं पुन्हां तुला हसूं आलें अन् बिचारा मामा अंगणाच्या मेरेवर बसून अडकित्त्यानें कचाकच सुपारी कातरूं लागला.

* * *

सुमित्रा घरांतून गेली अन् घरांतला उरलासुरला आनंदसुद्धा निपटून निघाला आहे. तिच्या संचारानें सचेतन होणारें हें घर आतां निर्जीव, निःसत्त्व झालें आहे. संवय मोठी वाईट असते नाहीं? डोळे तिला शोधतात. कान तिची चाहूल घेतात. पण काय उपयोग त्याचा? आतां तिच्या-आमच्यांत बारा गांवांचें अंतर पडलें आहे. यापुढें कल्पनेला शरण जाऊन तिच्या तिथल्या हालचाली डोळ्यांपुढें उभ्या करायच्या.

ज्यांच्याकरितां जगावें, ज्यांच्या हर्षोल्लासांत आपणहि हृष्टपुष्ट व्हावें, अशा दोन व्यक्ति आमच्या डोळयांदेखत या घरांतून अदृश्य झाल्या. एकीला आमच्या मायेच्या कोषांतून काळानें छिनावून नेलें अन् दुसरीला मीं स्वतःच्या हातांनीं बाहेर ढकललें. आतां या घरांत आम्ही दोघें म्हातारीं आमच्या तरण्या दुःखांना अन् दाहक स्मृतींना उराशीं कवटाळून बसलों आहोंत.

आम्ही मुळुमुळु रडतों अन् आंसवांनीं शितें कालवून खातों असें मात्र कोणीं समजूं नये. आम्ही आतां त्यापुढच्या अवस्थेंत गेलों आहों. आम्हांला आतां आल्यागेल्याजवळ आमच्या वेदनांचा आविष्कारहि करावासा वाटत नाहीं अन् कोणाकडून सांत्वनाचीहि अपेक्षा उरली नाहीं. हृदयाच्या तडक-लेल्या तप्त भूमींत अश्रूंची तर केव्हांच वाफ होऊन गेली आहे.

आम्ही दोघेंच या घरांत वावरतों. आमचें नातें पतिपत्नीचें; पण किती

असक्त अन् अलिप्त झालों आहोंत आम्ही हल्लीं ! संभाषणसुद्धा विशेषसें होत नाहीं. ती आपल्या विषादांत अन् मी आपल्या व्यवसायांत. वाढायला आली तरी ती मुक्यानेंच पुढें उभी रहाते. मीसुद्धा शब्दाच्या ऐवजीं पालथ्या हातानेंच 'नको, पुरे,' सांगतों. कधीं लहर लागलीच तर चारदोन प्रश्नांची देवघेव होते अन् पुढें सगळें सामसूम. हें आम्हीं ठरवून सुरू केलें आहे असें नव्हे. सहजगत्याच हें असें घडत चाललें आहे. अन् मला वाटतें, आतां हें अखेरपर्यंत असेंच चालायचें !

काय दैवाची तरी विचित्र करणी पहा ! अनुकूल होऊन आलें तें सजल मेघासारखें शतसहस्र धारांनीं वर्षत. महायुद्ध सुरू झालें अन् इतकीं वर्षें रेंगाळत चालणाऱ्या माझ्या धंद्याला एकदम बरकत आली. थोड्याच कालांत चार पैसे संग्रहीं पडले. ठळकवाडींत जमिनीचा एक तुकडा घेऊन मीं हा छोटेखानी बंगला उभारला. हिनें माझ्या पाठीशीं लागून दोनतीन हजारांचे दागिने करून घेतले. मीं हिला म्हटलें.

" एवढ्या हौसेनें दागिने करवलेस अन् आतां सणासुदीलासुद्धा अंगावर कां घालीत नाहींस ? "

" कुमारची नवरी येईल तिच्यासाठीं आहेत ते. माझ्यासाठीं नाहींत कांहीं. म्हटलं चालता हात आहे तोंवर करून ठेवावेत. "

कुमार नुकताच बी. एस्सी. झाला होता अन् आम्हांला त्याच्या लग्नाचीं स्वप्नें पडूं लागलीं होतीं. ही म्हणे, 'कुमार किती गोरापान अन् सुरेख आहे ! त्याला नवरी कशी नक्षत्रासारखी आणायला हवी.' त्यावर मी म्हणें, 'एक वेळ नक्षत्रासारखी नसली तरी चालेल. पण ती शालीन हवी, प्रेमळ हवी.'

पण कुमाराला निराळींच स्वप्नें पडत होतीं. त्याच्या बरोबरीचे कॉलेज-मित्र कमिशन मिळवून हिंदी सैन्यांत दाखल झाले होते. कुमारहि त्याच मार्गावर होता. त्यानें जेव्हां आमची परवानगी विचारली तेव्हां ही तर हुंदके देऊन रडूंच लागली. मलाहि त्याचा तो विचार आवडला नाहीं. कुमार

म्हणजे आमची ‘ आंधळयाची काठी ’ होता. तो आपल्यापासून दूर कुठें तरी जाणार अन् तोहि रणाच्या खाईंत. कसें सहन व्हावें हें आमच्या वत्सल हृदयाला !

पण त्याची महत्त्वाकांक्षा उफाळून आली होती. निश्चय पक्का झाला होता. कसें अडवायचें त्याला ! अखेर आम्हीं जिवाचा धडा केला अन् म्हटलें, ‘ चला बाबा ! ’ पंख फुटलेलें पांखरूं घरट्यांत कोंडून रहात नाहीं. गगनभराऱ्या मारीत दिशांचा अंत पहायला जाणारच तें. असा विचार करून आम्ही दुबळ्या हृदयाला आश्वासन दिलें.

कुमारला कमिशन मिळालें अन् तो शिक्षणासाठीं प्रथम बंगलोरला अन् नंतर केरुयाला कांहीं महिने राहिला. एक वर्षानंतर महिन्याच्या रजेवर जेव्हां तो घरीं आला तेव्हां आम्हीं त्याचे दोहोंचे चार हात करायचें ठरवलें. आमच्या इच्छेला त्यानेंहि संमति दिली.

किती तरी मुली आम्हीं पाहिल्या ; पण सुमित्रेला जेव्हां पाहिलें तेव्हां मन म्हणालें, ‘ तूं जिला शोधीत होतास ती हीच मुलगी बरं का ! ’ मी कुमारच्या अंतरांत हळूच डोकावलों. तिथेंहि तिची छबी उमटली होती. बापाच्या आवडीशीं मुलाची आवड जमणें हा क्वचितच घडून येणारा योग केवळ तिच्यासारखी प्रियदर्शिनी शुभांगी समोर उभी होती म्हणूनच जमून आला होता. इतकी गोड मुलगी कुमारासाठीं राखून ठेवल्याबद्दल मीं त्या करुणाघनाचे आभार मानले.

‘ सखा सप्तपदी भव ’ म्हणून कुमारनें सुमित्रेचा हात आपल्या हातांत घेतला. अंजिरी साडी नेसून अन् सासूच्या हातून सगळे अलंकार लेवून तिनें आमच्या घरांत पाय ठेवला. सारें घर दीप्तीनें झळकलें. ती जेव्हां नमस्कारासाठीं माझ्यापुढें ओणवली तेव्हां मला वाटलें कीं, तिला जवळ घ्यावें, तिचें मुख कुरवाळावें अन् अंतरांत उमाळलेल्या वात्सल्याच्या धारांखालीं तिला न्हाणवून काढावें. पण ‘ चमत्कारिकच दिसतोय् सासरा ’ म्हणून भोंवतालचीं माणसें पुटपुटतील एवढ्यासाठीं मन आवरलें. मला त्या

आनंदाचा भार पेलवेना. डोळे ओथंबून आले अन् मी माझ्या खोलींत चालता झालों.

त्यापुढें सुमारें पंधरा दिवस आमच्या घरांत कांहीं ना कांहीं तरी चालू होतें. सुमित्रा कौतुकाची कमळिणी झाली होती. आमचें चिमुकलें जग तिच्याभोंवतीं फिरत होतें. नवी सून पाहायला येणाऱ्या आयाबाया 'तुम्हांला सून चांगली मिळाली हो काकू' म्हणून हिचें अभिनंदन करीत होत्या. आल्या गेल्यासाठीं ऊठबस अन् चहापाण्यांत मदत करतांना तिचा दिवस केव्हांच निघून जात होता.

कुमार आमचा थोडासा लाजाळूच. आमच्या देखत तरी निदान तो प्रणयाची धिटाई दाखवीत नव्हता. मीं त्याला एक दिवस म्हटलें, 'आतां संध्याकाळच्या वेळीं वाचीत काय बसला आहेस एखाद्या आंबलेल्या प्रोफेसरासारखा? जा कीं जरा बाहेर फिरायला. सुमित्रेचेहि पाय जरा मोकळे होऊं देत.' अन् मी असें बोलतांच विनयाच्या आवरणांतून तिचें स्मित हळूच डोकावलें अन् मला वाटलें कीं, श्रावणांतली जुईच बहरली आहे माझ्या घरांत.

कुमाराची रजा संपली अन् तो एक दिवस निघून गेला. मीं सुमित्रेच्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें अन् मला त्यांतलें कारुण्य अधिकच जाणवलें. 'काय हल्लींच्या पिढीचें जिणें! सदा धांवपळ. रोज नव्या समस्या अन् नव्या चिंता. सगळा विश्वप्रपंचाचा सागरच खवळून उठला आहे अन् मानवी प्राण्यांच्या ह्या इवलाल्या नौका लाटांचे तडाखे खात, कलंडत सांवरत कुठें तरी वाहवत आहेत. किती दिवस चालणार हें असें? आम्हीं उपभोगलेलें स्वास्थ्य अन् स्थैर्य आमच्या पोराबाळांना कधीं तरी मिळणार आहे का? ...'

कुमारचें पहिलें पत्र आलें तेंच मुळी कुठल्या तरी समुद्रावरून सुरकांडी मारीत जाणाऱ्या एका युद्धनौकेवरून. पत्र माझ्या नांवचें होतें अन् मी कांहीं कामासाठीं बाहेर गेलों होतों. मला घरीं यायला थोडा उशीर झाला

होता अन् तेवढ्या वेळांत सुमित्रेचा धीर सुटला होता. मी जरा रागानेंच तिला म्हटलें, ' सुमित्रा, हें ग काय ? पत्र फोडून वाचायचें नाहीं का ? अजून परकेपणा गेला नाहीं का तुझा ? ' अन् मग कुमारनें खुशाली कळवून आपली महत्त्वाकांक्षा सफल होत असल्याचा आनंद जो परोपरीनें व्यक्त केला होता, त्याच्याशीं आम्ही सगळीं समरस झालों.

' तुला नाहीं का ग पत्र आलं ? ' या माझ्या प्रश्नाला नकारार्थी मान हालवून जेव्हां सुमित्रा सटकली तेव्हां माझ्या मनाला टांचणी टोचल्यासारखें झालें. मीं उत्तरांत त्याला लिहिलें —

' कुमार, ' बायको आल्यावर आईबापांना विसरला ' असं आम्ही कदाचित् म्हणूं, म्हणून तूं माझ्या नांवें पत्र पाठवलंस, होय ना ? पण आमच्या मनांत तसला वांकडा विचार कधींहि यायचा नाहीं. यापुढचीं पत्रं तूं सुमित्रेला लिहीत जा. तिच्या लखोट्यांत आम्हांला एक चिठ्ठी लिहिलीस कीं बस्स आहे. आज तिचं गोरंमोरं झालेलं तोंड मला पाहवलं नाहीं. माझं हें उत्तर जेव्हां मीं तिला वाचायला दिलें, तेव्हां तिच्या दृष्टींत कृतज्ञता तरंगली. ती दृष्टि सांगत होती, ' मामंजी, तुम्ही वृद्ध झालां असलांत तरी आपलं तरुणपण विसरलां नाहीं. '

त्यानंतर दोन महिने गेले अन् श्रावण उजाडला. हिनें सुनेची मंगळागौर घरीं थाटानें करायाचें ठरवलें. त्या दोघींनीं खपून तयारी केली अन् मला म्हाताऱ्याला ' हें आणून द्या अन् तें द्या ' म्हणून सतावलें. सोमवारीं सकाळीं न्हाऊन अन् शालू नेसून सुमित्रा देवळांत गेली अन् शिवामूठ वाहून आली. तिच्या पाठोपाठ एक तांबडी सायकल दारांत थांबली. पोस्टमननें तारेचा लखोटा हातीं दिला. सही करून मी तो कापऱ्या हातांनीं फोडला.

तार कसली; शतधार वज्र आदळलें होतें तें आमच्या कुटुंबावर ! कोणत्या तरी परदेशच्या रणभूमीनें कुमारचा बळी घेतला होता. अजून ती आठवण झाली कीं काळीज चरचरतें. डोंगराएवढें दुःख आम्हांला गिळावें लागलें तरी आम्ही जिवंत कशीं राहिलों याचेंच मला नवल वाटतें. मानवी

जीवित जर पाण्यावरचा बुडबुडा, तर त्या दारुण अपघातानें आमचे हे दोन बुडबुडे कां फुटले नाहींत ?

पुढें पंधरा दिवसांनीं सुमित्रेचे वडील तिला न्यायला आले. त्यांच्या दृष्टीनें बरोबर होतें तें. वस्तुतः तिचें कोण होतें आतां या घरांत ? आम्ही तरी तिला कोणत्या तोंडानें 'जाऊं नको' म्हणणार होतों ? ज्याच्या मार्फत आमचा अधिकार तिच्यावर पोंचायचा, तो मधला दुवा निखळून पडला होता. पण सुमित्रा गेली नाहीं. मी जाणतों कीं, आम्हांला अशा स्थितींत टाकून जाणें बरें नव्हे, या जाणिवेनें ती राहिली. माणुसकीचा कस लागतो तो अशाच वेळीं ! तिच्या या सुजाणपणाचें कौतुक मी कोणत्या शब्दांनीं करूं ? ती जर निघून गेली असती तर पोरक्या पोराहूनहि आमची दशा निकृष्ट झाली असती. पुढें वाढून ठेवलेल्या ताटाला हीं शिवेनाशी झाली कीं ती म्हणायची, ' मीं जेवावं असं तुम्हांला वाटत असेल तर तुम्ही चार घास खाल्ले पाहिजेत. ' अन् तें ऐकलें कीं मी इकडे बकाबका अन्न गिळूं लागायचा.

अशा गूढ, विकल अवस्थेंत आला दिवस कंठीत असतां एक दिवस आंतल्या मनानं टोला हाणून मला विचारलें. ' भल्या गृहस्था ! स्वतःच्या दुःखानं किती दिवस कण्हत बसशील ? उरीं बाण लागून घायाळ झालेल्या त्या कोवळ्या जिवाकडे पहा कीं जरा आतां. तिला काय अन्नावारी मोल-करीण म्हणून राबवून घेणार आहेस का जन्मभर......? '

माझे डोळे उघडले. मी त्या दृष्टीनें कांहीं विचारच केला नव्हता अजून. सुमित्राहि कांहीं बोलली नव्हती. सगळींच भ्रमिष्ट झालों होतों आम्ही. मी त्या वर्षी जूनच्या सुरवातीला तिचें नांव कॉलेजांत दाखल केलें. पहिल्या दिवशीं कॉलेजला जातांना किती जड पावलांनीं ती बाहेर पडली ! तिचें अंतःकरण तर त्याहून जड झालें होतें. प्रथम प्रथम ती घरांतून गेली कीं सुखरूप परत येईपर्यंत माझा जीव इकडे टांगणीला लागायचा.

तिचें जीवन सांकळून राहिलें होतें, त्याला आतां कांहीं तरी निराळें

वळण लागलें. पण मधून मधून तिच्या हृदयींचा घाव उचकत होता. ती हताश होत होती. कपाळदुखी असह्य होऊन पडून राहत होती. माझ्या डोळयांचा जागता पहारा तिच्यावर असायचा. तिच्या प्रकृतींतला सूक्ष्मसा फरकसुद्धा माझ्या हृदयाच्या तबकडीवर नोंदला जायचा. अन् ती अशी गळून आहाळून गेली कीं हिनें माझ्या अन् मी हिच्या तोंडाकडे पाहत खिळून टाकल्यागत बसायचें अन् सुस्कारे सोडायचे.

एक दिवस सुमित्रेच्या गैरहजेरींत मीं सहजगत्या तिच्या खोलींत गेलों. किती नीटनेटकी अन् स्वच्छ ठेवली होती तिनें खोली! पण तिथल्या एका दृश्यानें मी चमकलों. तिच्या टेबलावर कुमारचा लष्करी गणवेषांतला फोटो अन् त्यावर एक ताजें गुलाबाचें फूल शोभत होतें. किती उमदा दिसत होता कुमार त्या गणवेषांत! माझे डोळे भरून आले. किती तरी वेळ मीं तिथें निश्चल उभा होतों. माझ्या दृष्टींतल्या किरणांनीं त्याच्यांत जीव ओतूं पाहत होतों. त्याच्या साऱ्या मधुर स्मृतींना आवाहन करीत होतों. पण—

तो आतां सुमित्रेला, मला कधींहि दिसणार नव्हता. पण सुमित्रा अजून त्याच्या छायालेखाची पूजा करीत होती. अजून त्याला आळवीत होती. अजून त्याच्यासाठीं झुरत-खंगत होती. मला तें रुचलें नाहीं. मीं तो फोटो तिथून उचलला अन् माझ्या ट्रंकेंत दडपून ठेवला.

तो सगळा दिवस ती बेचैन होती. तिचें कांहीं तरीं मूल्यवान् हरवलें होतें. पण ती त्याबद्दल आम्हांला विचारूं शकत नव्हती. संध्याकाळीं मोठ्या कष्टानें जेवायला आली तेव्हांहि तिचे नाकडोळे लाल झालेले होते. मीं तिला म्हटलें.

“सुमित्रा, भूतकाळच्या काळोख्या गुहेंत वावरूं नको. भविष्यकाळाकडे नजर लाव. प्रकाश त्या बाजूला आहे.”

माझें हें बोलणें हिला उखाण्यासारखें वाटलें. पण ती समजली त्याचा आशय. आपलें आवडतें सुख म्हणा, दुःख म्हणा, हिरावून घेणाऱ्या या

सासऱ्याला तिनें पाषाणहृदयी ठरवलें असेल. पण मीं हें क्रूर कर्म तिच्यासाठीं केलें होतें. तिच्या बऱ्यासाठीं !

मध्यंतरीं आणखी एकदां तिच्या वडिलांनीं तिला माहेरीं नेण्याचा प्रयत्न केला. त्यांना सुमित्रा कायमची घरीं यायला हवी होती. नुसती नव्हे; तर तिच्या दागिन्यांच्या डब्यासह. पण मीं तिला पाठवलें नाहीं अन् तिनेंहि त्याबद्दल जिवाला लावून घेतलें नाहीं.

ती आतां अभ्यासांत रस घेऊं लागली होती. इंटरच्या परीक्षेंत तिला दुसरा वर्ग मिळाला अन् बी. ए. च्या परीक्षेंत शक्य तर पहिला वर्ग मिळवायचा अशी ईर्षा तिच्या मनांत निर्माण झाली होती. चार मुलींसारखें नीटनेटकें वागावें, कॉलेजच्या चळवळींत यथाशक्ति भाग घ्यावा, असें वाटण्याइतपत तिचें मन खड्ड्यांतून वर आलें होतें. झुळझुळीत साडी नेसून मीं बक्षीस म्हणून दिलेलें नाजुकसें घड्याळ हाताला बांधून चपला फरफरवीत ती 'जातें होऽ' म्हणून पायऱ्या उतरली कीं मला वाटायचें. 'आमची सुमित्रा आतां माणसांत आली बरं का.'

पुढें एक दिवस ती हळूच माझ्या खोलींत आली अन् कॉलेजच्या त्रैमासिकाचा अंक माझ्यापुढें टाकून चालती झाली. काय विशेष म्हणून मी तो चाळूं लागलों तों दहाव्या पानावर तिची गोष्ट. मला कांहीं चिमणा-चिमणीच्या गोष्टी वाचायचा छंद नव्हता. पण सुमित्रेची म्हणून मीं ती गोष्ट समग्र वाचली अन् बाहेर येऊन तिला म्हटलं.

"अरे वा: ! ही नवीन कला कधींपासून पैदा केलीस ? आम्हांला थांगपत्ता लागू दिला नाहींस."

"मला कुठें काय येतंय् ? पण संपादक अगदीं पाठीस लागले. म्हणाले कीं, तुमच्या गोष्टीशिवाय पुढचा अंक बाहेर पडायचा नाहीं. म्हणून कांहीं तरी लिहिलं झालं."

"कोण हे संपादक ?"

“ माझ्याच वर्गांतले एक विद्यार्थी आहेत. देशमुख त्यांचं आडनांव. पण कॉलेजमध्यें ते कवि ‘ सूर्यकांत ’ म्हणून प्रसिद्ध आहेत. संस्कृतचे स्कॉलर आहेत ते. कविता किती सुंदर करतात ! यंदांच्या गॅदरिंगमध्यें त्यांच्या काव्यगायनाला खूप मजा आली—”

दुपारीं पडल्या पडल्या आणखी एकदा तो अंक चाळीत असतांना दुसऱ्या पानावर सूर्यकांताची कविता आढळली. ‘ विनयव्रतीस—’ असा तिचा मथळा होता. ती सगळी कविता मीं वाचली अन् चकितच झालों. त्या कवितेची आराध्यदेवता सुमित्राच असावी असा मला दाट संशय आला. कारण तिच्यांतल्या पंक्तीपंक्तींतून उमटलेल्या स्वभावरेखा तिच्याच होत्या. आणि आज दुपारीं सूर्यकांताचें वर्णन करतांना सुमित्रेची रसना अमृतानें ओलावल्याचें माझ्या ध्यानीं आलें होतें.

माझ्यापुढ एक नवीनच समस्या उभी राहिली. हा परस्पर अनुरागाचा तर प्रकार नसेल ना ? अन् तसें असेल तर मीं काय करायचें ? अनुरोध का विरोध ? पण विरोध तरी कां म्हणून करायचा ? सूर्यकांत जर सच्छील अन् समर्थ असेल तर सुमित्रेनें त्याच्याशीं नवा संसार खुशाल उभारावा. पण तो तसा नसला तर—? आगाऊ सूचना मला मिळाली आहे हें खरें ; पण दुखणें अवघड जागीं आहे. सुमित्रेला स्पष्ट विचारूं का एकदा ? पण पुरावा काय ? ही कविता ? कदाचित् मला झालेला हा साक्षात्कार नसून आभासहि असेल. अशा स्थितींत मीं तिला विचारलें अन् खरोखरीच तसें कांहीं नसलें तर तिचा जीव किती दुखावेल !

पुढें दोनतीन महिने मीं सुमित्रेच्या हालचालींवर बारीक लक्ष ठेवून घालवले. पण मला संशयास्पद असें कांहींच आढळलें नाहीं. तिच्या तोंडून त्या अवधींत सूर्यकांताचें नांवसुद्धा निघालें नाहीं. मला वाटलें, कीं मीं उगाच संशयाचें भूत माजवून जिवाला त्रास करून घेतला. पण मी वेडा नव्हतों अन् माझा तो संशयहि खोटा नव्हता.

त्या दिवशीं तिची मुखप्रभा एकाएकीं मंद पडली होती. तारवटलेले डोळे रात्रीचें जागरण अन् मनस्ताप सुचवीत होते. मोठ्या कष्टानेंच ती त्या दिवशीं कॉलेजला निघाली होती. तिच्या चपला मागच्या दारीं राहिल्यामुळें हातांतलीं पुस्तकें बाहेरच्या टेबलावर आपटून ती मागें गेली. तेवढ्यांत वाऱ्यानें खट्याळपणा करून वरच्याच पुस्तकाचीं पानें फड-फडवलीं अन् त्यांतला एक कागद बाहेर फेकला. तिला त्याची दाद नव्हती. त्यामुळें ती सरळ पुस्तकें उचलून चालूं लागली.

आणि वहाणांच्या शेल्फच्या मागें पडलेला तो कागद नेमका माझ्या हातीं लागला. सहज म्हणून मीं तो उलगडला तों वरतीं मायना 'प्रिय सुमित्रा...' मी आधाशासारखा खालचा मजकूर वाचूं लागलों.

"आणखी पंधरा दिवसांनीं बी. ए. ची परीक्षा झाली कीं मी घरीं जाईन. गेल्यावर माझ्या लग्नाचा विषय पुढें येईल. अनेक उपवर वधू माझ्यापुढें उभ्या करण्यांत येतील. 'मी माझी वधू निवडली आहे असें मला त्या वेळीं आई-वडिलांना सांगतां येईल का? तूं माझ्या प्रेमाचा स्वीकार करशील का सुमित्रा? तुझ्या उत्तराची वाट पहातों.

तुझा
सूर्यकांत"

एवढ्यानेंच संपलें नव्हतें. त्या पत्राखालच्या कोऱ्या जागेंत सुमित्रेचें उत्तर होतें.

"......तुमच्या मागणीला नकार लिहितांना माझा हातच नव्हे; तर सर्वांग थरथरत आहे. पण काय करूं? ही गोष्ट माझ्या मामंजींना आवडणार नाहीं. आणि त्यांचें मन दुखवून मला माझ्या सुखाचें मंदिर उभारायचें नाहीं. सूर्यकांत! निष्फळ आशेवर तरंगूं नका. मला विसरून पुढचा मार्ग धरा. माझा जन्म प्रेमसाफल्यासाठीं नाहीं......

सुमित्रा"

तिच्या त्या मोजक्या ओळी; विशेषतः शेवटचें वाक्य—‘ माझा जन्म प्रेमसाफल्यासाठीं नाहीं.’ तें वाचून माझ्या काळजाला डाग बसला. ‘छे:! छे:! सुमित्रा, मला ओळखलें नाहींस तूं अजून.’ जणूं ती समोरच आहे अशा कल्पनेनें मी पुटपुटलों. तें पत्र माझ्या हातीं पाडून देवानें किती उपकार केले माझ्यावर—

कॉलेजमध्यें गेल्यावर पत्र हरवल्याचें तिच्या निदर्शनाला आलें असेल. कारण कपाळदुखीचें निमित्त करून ती तास बुडवून घरीं आली. अधाशी पण चोरट्या नजरेनें ती कानाकोपरा धुंडाळते, खोलींतलें प्रत्येक पुस्तक फरफरवते, हें मी पहात होतों. पण तिचें गुपित माझ्या हातीं लागलें आहे असा पुसटसा भावसुद्धा मी मुद्रेवर दाखवला नाहीं. पुढें काय करायचें तें मीं निश्चित केलें होतें अन् आतां तिची नुसती गंमत पहात होतों.

परीक्षा संपेपर्यंत तिचें चित्तस्वास्थ्य बिघडूं न देण्याची जबाबदारी माझ्यावर होती. परीक्षा संपली अन् तिच्या सगळ्या उत्तरपत्रिका चांगल्या गेल्या आहेत असें जेव्हां मला समजलें, तेव्हां ताबडतोब मी कॉलेजांत गेलों. सूर्यकांत तांतडीनें निघून गेला होता. मीं त्याचा पत्ता मिळवला अन् दुसऱ्या दिवशीं ‘ गांवाला जाऊन येतों ’ असें घरांत मोघम सांगून मालवणचा रस्ता धरला. घरीं आल्यावर सुमित्रेनें मला विचारलें.

“ गांवाला जातांना विचारूं नये; पण परत आल्यावर विचारायला हरकत नाहीं. कुठें गेलां होतां चार दिवस ? ”

“ गेलों होतों एका कुळाकडे ! ”

“ कांहीं देण्या-घेण्यांचा व्यवहार आहे ? ”

“ इतके दिवस नव्हता; पण आतां करायचा आहे. ”

“ पैसे देणार आहांत त्याला ? ”

“ पैसे नव्हेत—पण आत्तां नको तो विषय. मला आधीं चहा आण पाहूं. ”

त्याच दिवशीं दुपारीं मीं तें पत्र ट्रंकेंतून बाहेर काढलें अन् सुमित्रेच्या त्या उत्तराखालच्या मोकळया जागेंत लिहिलें.

" थोर मनाच्या मुली ! माझ्यासाठीं स्वतःच्या जीवनावर निखारा ठेवं नको. अशी जळत, पिचत तूं माझ्या घरांत राहिलीस तर तुझ्याहून माझाच जीव अधिक तळमळेल. पोरी, तुझं प्रेम सफल होऊं दे ! त्यासाठीं मीं स्वतः पुढाकार घेतला आहे. योग्य वेळीं सूर्यकांताच्या मागणीला सक्रिय उत्तर मिळेल.

तुझा

मामंजी "

तिला कळूं न देतां मीं तें पत्र तिच्या टेबलावर एका पुस्तकाखालीं घालून ठेवलें. थोड्याच वेळांत तें तिच्या हातीं लागलें याची मला खात्री पटली. कारण प्रथम ती बराच वेळ बाहेर येईना. अकल्पित आनंदानें अनावर झालेल्या मनाला प्रकृतीवर आणायला तिला बरेच श्रम पडले असतील. बाहेर आली तरी माझ्या नजरेसमोर राहीना. तिची कळी उमलली होती, भावसुगंधानें दरवळली होती हें नक्कीच. पण समोरून मला तिचें दर्शन होईना. मीं म्हटलें न होईना का; तिचा लाजाळू संभ्रम तरी काय कमी गंमतीचा आहे !

मीं हिला एकांतीं बोलावून घेतली अन् विचारलें.

" एका महत्त्वाच्या कामीं तूं मला मनोभावें मदत केली पाहिजेस. करशील ना ? "

" हें काय बाई विचारणं ! मी कधीं आपल्या आज्ञेबाहेर गेलें आहे ? "

मला धीर आला. मीं तिला सगळया गोष्टी समजावून सांगितल्या. पण तिला तो कडू घोट गिळतां गिळवेना. अखेर मीं म्हटलें, ' सुमित्रेचं कल्याण होईल. एका करपलेल्या अंकुराला नवजीवन मिळेल. त्या वज्राघाताच्या प्रसंगीं सुमित्रेनं आपलं दुःख गिळून आम्हांला सावरलं. आपण दोघं थोड्याच

दिवसांत जगाचा निरोप घेऊं. पण सुमित्रेला उभं आयुष्य घालवायचं आहे. यापुढें तरी तिला सुख लाभूं दे म्हणून तूं तिला आशीर्वाद नाहीं का देणार?"

डोळ्यांना पदर लावून तिनें मानेनेंच 'देईन' असें सांगितलें. 'चल तर मग देवघरांत' असें म्हणून मी उठलों. देवघरांत जाऊन आम्ही देवापुढें उभीं राहिलों. हिनें समई लावली अन् मी सुमित्रेला हाक मारली. ती दारांत येऊन उभी राहिली. 'अशी आमच्याजवळ ये.' मीं म्हटलें. ती जवळ आली तशी देव्हाऱ्यांतला कुंकवाचा करंडा हिच्या हातीं देऊन मीं सांगितलें.

"तुझ्या वज्रचुड्यांच्या हातांनीं सुमित्रेच्या कपाळीं कुंकू लाव."

थरथरत्या हातांनीं हिनें तिला कुंकू लावलें. आमच्या घरांत केवढा करुण-गंभीर प्रसंग होता तो! सुमित्रासुद्धा वावटळींत सांपडलेल्या केळी-सारखी कांपत होती. तिला देवीला नमस्कार करायला लावून मीं विनवलें.

"आई, जगदंबे! हें माझं लेकरूं मीं तुझ्या ओटींत घातलं आहे. त्याच्यावर मंगलांचा वर्षाव कर!"

नंतर तिनें आम्हां दोघांना नमस्कार केला अन् तशीच माझ्या तोंडा-कडे पहात उभी राहिली. तिला ढीगभर बोलायचें होतें; पण वाचा पांगुळ झाली होती. कशींबशीं दोन अक्षरें तिच्या तोंडून निघालीं.

"बाबा ऽ!"

मीं विस्मित होऊन तिला विचारलें,

"कोणाला म्हणालीस तूं बाबा? ...मला?"

"होय. तुम्हांलाच म्हणालें. या घरांत माझा मृत्यु झाला अन् याच घरांत मला पुनर्जन्महि मिळाला. अन् तो तुम्हीं दिलात. जन्माला घालणाऱ्या बापानं पोटीं स्वार्थ धरला अन् तो साधेना म्हणून माझी उपेक्षा केली. पण तुम्ही धर्माचे बाप होऊन पाठीशीं उभे राहिलांत. जें सासर होतं तेंच माहेर झालं. बाप किती कनवाळू अन् चांगला असूं शकतो, हें तुमच्या हृदयांत मला पहायला मिळालं...."

मला पुढं ऐकवेना. मीं तिच्या तोंडावर हात ठेवला अन् तिला हृदयाशीं कवटाळलें. तिनें माझ्या खांद्यावर मान टाकली. अष्टौभावें उचंबळलेल्या त्या सुखाच्या सागरांत मी सगळाच्या सगळा विरघळून जातों कीं काय असें मला वाटलें. दुसऱ्याला सुखी केल्याचा आनंद किती अनिर्वाच्य असतो, त्याचा साक्षात्कार मला त्या प्रसंगीं घडला. तोच माझ्या जीवनांतला शेवटचा सुखक्षण! कपाळावर आलेले तिचे केस, कोवळिकेच्या हातानें मागें सारतांना मीं तिला म्हटलें.

"पोरी, फिरून एकदां 'बाबा" म्हणून हाक मार मला. त्या शब्दांतल्या अमृतरसानं मला माझं हृदय भरून घेऊं दे!"



## ७ : : कुंकवाचा धनी

माझ्या आईला दमा नाही. दादांना पण नाहीं. मग माझ्या वांट्याला कुठून आलं हें भाग्य देव जाणे! आईच्या पदराखालून सुटतें न सुटतें तोंच या जीवघेण्या व्याधीनं मला घेरलं. अवसेपुनवेला जोर व्हायचा अन् नेहमीं घशाची सारंगी वाजतच राहायची.

मी दिसायला वाईट नाहीं. अक्षरशत्रुहि नाहीं. पण माझ्या रूपावर कधीं तेजाची कळा चढली नाहीं. वसंताचं नुसतं वारं आलं तरी सृष्टि खुलते, टवटवीत होते. पण अठरा वर्षांच्या उमेदीच्या वयालाहि माझ्या अंगीं तारुण्याची नव्हाळी म्हणावी तशी प्रगटली नाहीं. मी वाढलें; पण खऱ्या अर्थानं खुरटलेलीच राहिलें.

माझ्यासारख्या गोऱ्या, नाजूक मुलीला किती सुंदर स्थळ मिळायला हवं होतं! पण या दम्यानं दावेदारी साधली. एक हेंगाडं ध्यान माझ्या वांट्याला आलं अन् मी या कुग्रामांत जन्माची येऊन पडलें! माझं लग्न करतांना दादांनीं आपल्या जांवयाचं रूप, वय, विद्या, अक्कल कांहीं-कांहीं पाहिलं नाहीं. त्यांनीं पाहिलं तें एवढंच, कीं सगळ्यांनीं नाकारलेली आपली मुलगी एकदाची उजवली जाते.

दादांना तरी मी दोष कसा देऊं? आईला नांवं कशीं ठेवूं? त्यांचीं हृदयं म्हणजे मायाममतेचीं उघडीं भांडारं आहेत. या कळिंद्राच्या हातीं मुलगी निरवतांना त्यांच्या हृदयाचा ठाव सुटला नसेल का? खात्रीनं. पण

करतील काय? माझ्याप्रमाणेंच तेहि परिस्थितीच्या फासांत अडकलेले जीव! कुवार मुलगी कायमची घरीं ठेवून घेणं म्हणजे भलभलत्या लोकप्रवादांना आमंत्रण देण्यासारखंच होतं तें! माझं लग्न झालं नसतं, तर पाठच्या बहिणींच्या अंगाला हळद लागणं अवघड झालं असतं अन् सोन्यासारख्या माझ्या भावाला मुलगी द्यायला कित्येक वधूपिते कचरले असते. आम्ही कोकणचीं माणसं म्हणजे...

लग्न होऊन मी या घरीं आलें अन् पहिल्याच दिवशीं यांचं पाणी जोखलं. गृहस्थाचा अन् अकलेचा पुरता छत्तिसाचा आंकडा होता! लग्नासाठीं जमा झालेली यांची नातेवाईक मंडळी आठ दिवस घरीं तळ देऊन राहिली होती, मनाला येईल तें तळूनवळून खात होती अन् वर यांना 'खंडेराव' करीत होती. हे शेंडाबुडखा नसलेलें अवाच्य कांहीं तरी बडबडत होते अन् त्या माणसांची करमणूक करीत होते. हे लोक आपला उपहास करीत आहेत असं त्यांना चुकूनसुद्धा कधीं वाटलं नाहीं. निंदास्तुतींतला फरक न समजणारा तो पुरुष एका दृष्टीनं भाग्यवान् होता. कारण, त्यामुळं त्याच्या मनाला कसलीच बाधा होत नव्हती.

तो प्रकार पाहून माझ्या जिवाला मात्र कस्यार लागायची. माझी जाणीव जागृत होती ना! मीं एक दिवस एकांतीं यांना हें समजावून द्यायला लागलें तर स्वारी माझ्यावरच कडाडली, 'मला शिकवतेस? थोबाड फोडून टाकीन!' मीं कपाळाला हात लावला अन् बाजूला झालें.

त्या मंडळींनीं गाशा गुंडाळल्यावर मला हायसं वाटलं हें खरं; पण त्याच क्षणीं मी त्या घरांत एकटी पडलें. भयानक एकान्त मला सर्व बाजूंनीं घेरून उभा राहिला. 'देवा, कसे रे दिवस काढूं मी इथं!' माझ्या भ्यालेल्या जिवाचं आर्त आक्रंदन उठलं.

माझं माहेर जरी खेडंच होतं, तरी आमच्या आळीला आठदहा घरं होतीं. मागच्या भागाला कुळवाड्यांचा शेंशंभर उंबरा होता. देवळांत भजनं चालायचीं; काले-जत्रा व्हायच्या, सुपारी, नारळ, काजू खरीदण्यासाठीं

वाणी-उद्मी यायचे, त्यांच्या घोड्यांच्या गळ्यांतलीं घुंगरं खुळखुळत राहायचीं, असं आमचं हसतं खेळतं गांव होतं. पण इथं पाहतें तों आमचं घर म्हणजे परब्रह्म ! 'एकमेवाद्वितीय !' सभोंवतीं टेकड्यांचा वेढा. मैल-भर चढण चढून टेकडीच्या माथ्यावर जावं तेव्हां कुठं माणसाची 'जात' दिसायची ! पहांटेच्या प्रहरीं टेकडीवरच्या त्या खोपट्यांतून कोंबड्याची साद ऐकूं येई तेवढ्यावरून मनाला धीर यायचा, कीं आपण मनुष्यवस्ती-पासून अगदींच तुटलेले नाहीं.

नाहीं म्हणायला एक सोबत होती ती धान्या गड्याची. आमच्या आंगणाच्या मेरेला लागूनच त्याचं तणार होतं. खरं म्हणजे तो आमच्याच घरीं राहात होता, तिन्ही ठाव आमच्याकडे उकळीत होता अन् फक्त रात्रीं झोपायच्या वेळीं तेवढं आपल्या झोंपडीचं कवाड उघडीत होता.

धान्या यांच्याच वयाचा म्हणजे तिशी-पस्तिशीचा असेल. त्याचं लग्न लहानपणींच झालं होतं. पण ऐन पंचविशींत त्यानं जे गुण उधळले ते असह्य होऊन त्याच्या बायकोनं त्याला सोडचिट्ठी दिली होती. आपल्या संसाराची अशी परवड करून तो मग आमच्या घरीं राहायला आला होता. यांना माणसाची गरज होतीच. गोठाभर गुरं, पांचशें पोफळींचं कुळागर अन् खंडीभर बीं पडेल एवढं शेत इतका यांचा व्याप होता. लहानपणींच आईबापांचं छत्र फाटल्यामुळें अन् पाठचा भाऊहि मरून गेल्यामुळें हे एकटेच होते आणि अशा स्थितींत धान्याला त्यांनीं घरीं ठेवून घेतलं हें एकापरीं ठीकच होतं.

गडी म्हटला कीं त्यानं दिवसभर पडेल तें काम करीत असायचं ही त्याची रीत असायला हवी. पण धान्या मोठा मिजासखोर होता. अंग मोडून काम करतांना तो मला कधींच दिसला नाहीं. सकाळीं दाढी करायला अर्धा तास लागे त्याला. घमघमीत वासाचा साबण अंगाला घासल्यावांचून त्याची आंघोळ होत नसे ! नेशीत असे कासटीच; पण ती नेहमीं स्वच्छ

असायची. डोक्याचा ‘ हुर्मल ’ पण निर्मळ असायचा, चाफा म्हणा, मोगरा म्हणा, कसलं तरी वासाचं फूल नेहमीं त्याच्या कानाला खोवलेलं असायचं.

नाहीं तर आमचं हें ध्यान ! दाढी चरबट वाढलेली. महिनामहिना हजामत नाहीं. घामानं चिकट झालेल्या देहावर सदैव चिखलाचीं पुटं चढलेलीं. आपल्याला देवानं दांत दिले आहेत याची जन्मांत कधीं जाणीव नाहीं ! दारांत खळाळता पाट आहे, पाणी शंखासारखं स्वच्छ आहे ; पण यांचं आपलं बुडबुड काक-स्नान ! त्या दोघांना एकत्र पाहिलं कीं माझ्या मनाला भ्रम पडे, ‘ यांच्यांपैकीं ब्राह्मण कोण ? हे का धान्या ? ’

धान्याच्या अंगीं पेंचपाच होते अन् हे मुलुखाचे अजागळ होते. आणि यामुळेंच गडी म्हणून घरांत आलेला धान्या आज घरमालक बनला होता अन् हे गडी झाले होते ! आमच्या संसारावर तो यथेच्छ चरत होता अन् हे नुसते कामाचे हमाल बनले होते. आज शेतांत कवळं टाकून ये ’ ‘ उद्यां तळयाचा बांध दुरुस्त करून ये ’ असं त्यानं विडीचे झुरके घेत हुकूम सोडायचे आणि यांनीं निमूटपणं ते पाळायचे !

ज्याला कळतं त्यानं न कळत्याला सांगावं, त्याच्याकडून करून घ्यावं हें ठीक आहे ; पण धान्या तेवढंच करून थांबत नव्हता. यांनीं सांगितलेलं काम केलं नाहीं किंवा केलेल्यांत कांहीं कसर उरली तर तो बेलाशक यांची घडेस्त्री काढायचा अन् हे ओशाळवाणं हसायचे.

ही तऱ्हा पाहिली कीं माझ्या वर्मीं कळा लागत. मी मनांत म्हणें, वेळीं अवेळीं ‘ थोबाड फोडीन, ’ ‘ कंबरडं मोडीन ’ असं मला चिप् चिप् करणारे हे ; मग धान्यापुढें यांची मर्दुमकी कां पड खाते ? ‘ धान्या, वरच्या पायरीला पाय लावतोस. मी मालक आहें या घरचा. मी व्यवस्थित संसार करीन नाहीं तर आग लावून देईन घरादाराला. तुला बोलायचं कारण नाहीं. खालच्या मानेनं राहा ; नाहीं तर उचल आपली कांबळ. ’ असं हे त्याला कां बजावीत नाहींत ?

पण लगेच विचार येई, इतकी अक्कल अन् जबाबदारी संभाळण्याची कुवत यांच्या अंगीं असती, तर हे घोडनवरे कशाला राहिले पस्तीस वर्षापर्यंत ! एव्हाना चार पोरं घरांत खेळलीं असतीं !

अशा एक नव्हे, अनेक गोष्टी माझ्या अंतरांत डाचत होत्या. मी तोंड दाबून बुक्क्यांचा मार सोशीत होतें. एक दिवस अशाच कांहीं तरी कारणावरून माझा अंतरात्मा खवळला अन् मीं त्यांना धारकीं धरलं.

" तुम्हांला शहाणपण येणार आहे तरी केव्हां? गळा-सुरी त्या धन्याच्या हातीं देऊन बसलां आहां तुम्ही. कोण तो तुमचा काका, मामा लागून राहिला आहे ? परवां दहा मण आमसुलं त्यानं वाण्याला विकलीं. तुम्ही त्याच्याकडनं पैसे घेतलेत त्यांचे? तो आठवड्याच्या बाजाराला जातो, फणस विकतो, केळीं विकतो–कधीं हिशेब मागितला आहे त्याच्याकडे ? पावसाळ्याला कांबळ आणायची झाली, धान्या पैसे दे. घरांत मीठमिरची घ्यायची झाली, धान्या पैसे दे. हें उत्पन्न काय याच्या बापाचं? सकाळीं उठला कीं धारोष्ण दुधाचा चहा लागतो त्याला. एक दिवस रात्रचिं दूध घालून दिला तर मेल्यानं कडवट तोंड करून अंगणांत फेकला. रात्रीं आठ वाजतां तो पडवींत येऊन हजर होतो अन् कढत आमटीभात त्याला वाढावा लागतो. भूक सोसवत नाहीं म्हणे त्याला ! अन् तुम्ही रात्रीं दहा दहा वाजेपर्यंत वरच्या वाड्यावर कुळवाड्यांची दारं मळतां. तुमची चुडणी केव्हां टेकडी उतरते त्याची वाट पाहात मीं मागच्या ओसरीवर बसायचं आणि तुम्हीं आल्यावर दोघांनीं ते शिळे गोटे खायचे... "

मी बोल बोल बोललें. म्हटलं कांहीं तरी डोक्यांत प्रकाश पडेल. पण कुणापुढं वाचली गीता म्हणतात ना, तशांतला प्रकार झाला ! हे एकदा निलाजरं हसले अन् तोंड घेऊन चालते झाले.

धान्या हळूहळू माझ्यावरहि हुकुमत गाजवूं लागला होता. यांनीं मला सकाळच्या प्रहरीं भिरंडं फोडायला बस म्हटलं कीं धान्या वासरासाठीं कुळागरांतून चार आणायला सांगायचा अन् मग हे म्हणायचे, " तसंच

कर. आधीं चारच घेऊन ये." माझ्या जिवाचा संताप अनावर होई अशा वेळीं. मी मग तिसरंच कांहीं तरी काढून बसें.

मी त्याचा हुकूम धाब्यावर बसवतें असं जेव्हां त्याला दोनचारदा दिसून आलं तेव्हां त्यानं मला एक दिवस तीव्र शब्दांत बजावलं.

"या घरांत धान्या म्हणेल तेंच झालं पाहिजे. तुझा नवरा आहे व्यवहारशून्य. सोन्याच्या तुकड्यासारखं हें कुळागर. पण यानं त्याची दशा करून टाकली होती. सगळं उजाड होण्याची वेळ आली होती. तीनशें रुपये कर्ज झालं होतं. सावकार भुंग्यासारखा पोखरीत होता. मी इथं आलों, संसाराचा डाव हातांत घेतला अन् तुझ्या नवऱ्याची मान सोडवली. म्हणून आज इथं तूं सुखानं ग्रास गिळते आहेस. समजलं, वहिनी? तेव्हां या घराचा घरधनी मी आहें असं समज अन् सांगेन तें मुकाट्यानं ऐकत जा. मला गोडी लावून राहिलीस तर तुला फुलासारखी झेलीन!"

हें शेवटचं वाक्य बोलून धान्या मिष्किलपणें हसला.

'अरे हरामा! मी तुला गोडी लावून राहूं होय? मला कळला बरं तुझा गर्भितार्थ.' मीं आंतल्या आंत दांतओठ खाल्ले. पण करतें काय? माझी अवस्था मोठी शोचनीय झाली होती. कुणाला सांगूं माझं गाऱ्हाणं? आईबाप चार कोसांवर. घरांत कोणी कणखर माणूस नाहीं. ज्यानें माळ घालून आणलं तो जन्माचा जोडीदार असा जडभरत. त्याला या गोष्टी सांगण्यांतसुद्धा कांहीं अर्थ नव्हता. माझ्या शीलाचं रक्षण मलाच करायला हवं होतं. अन् मी तर शरीरप्रकृतीनं दुबळी. त्यामुळं माझा मलाच धीर वाटत नव्हता. मी आला दिवस चिंतेंत घालवीत होतें. जीव मुठींत घेऊन जगत होतें. शक्य तितकी धान्याच्या दृष्टीसमोरून दूर रहात होतें. धान्या हा आमच्या संसाराला जडलेला दुर्धर रोग होता; पण याचे कंद छेदणारा धन्वंतरि मात्र माझ्या डोळ्यापुढं नव्हता.

पुढं मृगाची ओल झाली अन् हे दोघे नांगरणीच्या कामांत गुंतले. आमच्या गांवांत शेतजमीन मुबलक तशीच सुपीकहि होती. कित्येक

परगांवचे कुळवाडी तिथं येऊन खंडानं शेत करीत. त्यामुळं आमच्या घराकडची रहदारी वाढली. सकाळ-संध्याकाळ माणसं दिसूं लागलीं. नांगराच्या बैलांना उद्देशून उच्चारलेले ‘ इरिरी, ’ ‘पापारी’ असले सांकेतिक शब्द कानीं पडूं लागले.

आषाढ उगवला तो मुळसांतला पाऊस घेऊनच. आमच्या वाटोळ्या डोंगरखोऱ्यावर ओथंबलेल्या काळ्या ढगांचं झांकण पडलं. धूमधार जलधारांनीं वृक्षवेली न्हाऊन निघाल्या. टेकड्यांवरून लहानमोठे ओहोळ खालीं उड्या घेऊं लागले. झाडांच्या टेकडीवर लटकणारे फणस पिकून धबाधब भुईवर कोसळूं लागले. गुरावासरांची चार दिवस दिवाळी झाली. महिनाअखेर पेरण्या आटपून मोकळे झालेले बैल गायींबरोबर स्वच्छंदपणें रानांत चरायला जाऊं लागले.

श्रावण आला अन् पहिली मंगळागौर एकटीनंच घरीं पुजून मी माहेरीं गेलें. तब्बल चार महिन्यांनंतर मला आईची ऊब अन् दादांची सावली मिळाली. माहेरीं माझी दुसरी मंगळागौर दणक्यांत झाली अन् उरलेले दोन मंगळवार मैत्रिणींच्याकडे साजरे झाले. मी त्या सुखाच्या दिवसांत सासर विसरलें. तिथलीं दुःखाचीं, अगतिकपणाचीं सळंहि विसरलें. मला लवकर पाठवून देण्याबद्दल दादांना जेव्हां निरोप आला तेव्हां मला कळलं, कीं ‘ हें घर, हीं सुखं, हीं माझीं नव्हेत. माझी मिराशी म्हणजे तें आंबोणीचं डोंगरखोरं अन् तिथला जबडा उघडून खायला उठणारा निर्जन एकान्त !’

घरची सर्व परिस्थिति वडिलांना सांगावी अन् त्यांनीं ठेवून घेतलं तर परत सासरचं तोंडसुद्धा पाहूं नये असं एकदा मनांत आलं. पण त्यांचा स्वभाव लक्षांत घेतां माझा हेतु साध्य होण्यासारखा नव्हता. अखेर आईच्या कुशींत तोंड खुपसून तासभर मुसमुसून रडलें अन् गाठोळं कडेवर उचललं.

मी घरीं येतें तों अंगणांतल्या मांडवावर दोडकींघोसाळीं लटकलीं होतीं. गुलबाक्षीचीं झाडं फुललीं होतीं. पाटाजवळच्या पानवेली या माझ्या जिवींच्या सांगतिणी. त्या तर नवऱ्यामुलीसारख्या तुरभुरल्या होत्या. कुळा-

गारांतल्या हिरव्या पोफळांवर नारिंगी रंग चढला होता. मलाहि माहेर चांगलं मानवलं होतं. आईच्या हातचं आयतं सुग्रास जेवून माझ्या अंगावर मूठभर मास चढलं होतं. मी जरा सुधारून आलें आहें हीं गोष्ट यांच्याआधीं धान्याच्या डोळ्यांत भरली होती. तो माझ्यापुढें गोंडे घोळूं लागला होता!

गणपति गेले अन् शेतांत जागोजाग माळे उभे राहिले. आमचाहि एक त्यांत होताच. भातं पसवून लोंब्यांतले दाणे दुधाळ झाल्याचा वास रानडुकरांना लागला होता. त्यांच्या झुंडी शेताकडे मोर्चा वळवूं लागल्या होत्या. त्यामुळं रात्री जागवून शेताचं रक्षण करणं हें क्रमप्राप्त होतं. धान्यानं ती कामगिरी पत्करली होती!

एके दिवशीं रात्रीचीं जेवणं झाल्यावर हे दोघे विड्या फुंकीत बसले होते. मी नुकतीच झाकपाक करून मोकळी झालें होतें. एवढ्यांत धान्या यांना म्हणाला, " आज तूंच माळ्यावर झोपायला जा. मला जरा कसर आली आहे. "

हे त्याचे शब्द कानीं पडले मात्र; मी एकदम चरकलें. फार खोल, फार घातक अर्थ होता त्या शब्दांत. क्षणभर विचाराची धार बोथटली. मनाला स्तंभ आला. थोड्या वेळांत मी सावरलें अन् एक निश्चय ठरवून बाहेर आलें.

आज माळ्याला मी जाणार आहें; तुम्हीं कुणीहि जाऊं नका.

धान्या 'आ' वासून बघतच राहिला. हे गोंधळल्यासारखे झाले. मी एक जुनेर अन् गोधडी खांद्यावर टाकली, एक चुडणी पेटवून हातांत घेतली अन् अंगणांत उतरलें. " तूं जाऊं नको, मागं फिर. " असं हे पडवीवरून जोरजोरानं ओरडत होते; पण मी त्या ओरडण्याला भीक घातली नाहीं.

रात्रीच्या वेळीं एकटं बाहेर पडणं हा माझा अविवेक होता का? नव्हता. तें विचारपूर्वक आचरलेलं साहस होतं. तें आत्मरक्षण होतं. त्या दिवशीं सकाळीं धान्या माळ्यावरून घरीं आला होता. येतांना ओंजळभर

सोनचाफीं आणून त्यानं माझ्या पायांशीं ओतलीं होतीं. मी त्या हसऱ्या सपर्ण पुष्पसंभाराकडे पाहात राहिलें होतें. अन् धान्यानं माझ्याकडे टक लावली होती. नंतर त्यानं कानाची विडी काढून म्हटलं होतं, " वहिनी, विडी पेटवायची आहे. चुलींतलं एक कोलीत आण." मीं तें आणून त्याच्यापुढं केलं होतं आणि त्यानं तें घेण्याचं निमित्त करून माझ्या हाताला स्पर्श केला होता. क्षणाचाहि विलंब न लावतां मीं तें कोलीत वांकडं केलं होतं. त्याच्या मनगटाच्या आंतल्या बाजूला त्या अग्निदेवानं एक तांबड्या पैशाएवढा चटका दिला होता. हात झटकून तो चार पावलं दूर झाला होता. कोलिताचे इंगळ त्याच्या डोळ्यांत जमा झाले होते. तो मला जणुं उभीच्या उभी जाळीत होता! त्यानं परत एकदां त्या भाजलेल्या मनगटाकडे पाहून मला म्हटलं होतं.

" पोरी! पाहून घेईन तुझ्या गमजा. पाखरूं माझ्या पिंजऱ्यांत अडकलं आहे हें लक्षांत ठेव!"

आज हे माळ्याला गेले असते अन् मी घरीं राहिलें असतें तर? आमच्या कंबळी घराला दारंसुद्धा नीट नव्हतीं. त्या निर्जन निराधार एकांतांत वासनेच्या आगीनं धगधगत पुढं उभ्या ठाकलेल्या त्या कालपुरुषाचा हात धरणारा कोणी नव्हता अन् मला अभयाचा हात देणाराहि कोणी नव्हता. घराच्यापेक्षां शेतांतल्या माळ्यावरच मी सुरक्षित राहाणार होतें. समजा, धान्या तिथं आला असता तर मी ओरडणार होतें अन् शेजारचे माळेकरी धावून येऊन मला सोडवणार होते. निदान आजचं मरण तरी टळणार होतं.

शेताची वाट माझ्या पायांखालची होती. कुळागराच्या दांड्याचा एकेक ओटा उतरून मी खालीं आलें. वईचा आखाडा उतरून शेतांत शिरलें. भाताचीं रोपटीं दोन्ही बाजूंना वळवून बायकांच्या भांगासारखी जी एक पाऊलवाट माळ्यापर्यंत बनवली होती तिच्यावरून मी माळ्याजवळ आलें. हातांतली चुडणी मेरेवर ठेवून दिली अन् वर चढलें.

'सुटलें एकदाची' असं मला त्या वेळीं वाटलं. पण लगेच भीतिहि मनांत शिरली. कारण, यापूर्वी मी कधींहि एकटी अशी उघड्या जागीं

झोंपलें नव्हतें. पण चोहों बाजूंनीं माळेकऱ्यांची जाग ऐकूं आली अन् भ्यालेल्या जिवाला धीर वाटला. अजून पुरती प्रहर रात्रसुद्धा झाली नव्हती. दुपारीं पाऊस पडून गेल्यामुळें आकाश निरभ्र होतं. द्वादशीचा चंद्र नुकताच माथ्या-वर चढला होता. चिमुकल्या चांदण्या त्याच्या तेजानं झाकुळल्या हात्या-भाताच्या लोंब्यांची पिवळी शोभा चांदण्यामुळं दुप्पट झाली होती. तें विस्तीर्ण शेत चंद्रिकेचं क्रीडांगण बनलं होतं. तिथून तोंड काळं करून गेलेला अंधार सभोंवतींच्या दाट झाडींत साकळला होता. तें निबिड रान धान्याच्या अंतःकरणासारखं वाटत होतं! जरा चाहूल लागली कीं माळेकरी मोठमोठ्यानं एकमेकांना साद देत होते अन् डबे बडवीत होते. पाठोपाठ सावजांच्या झुंडीचा घसघसाट झाडींतून दूर दूर जात असलेला ऐकूं येत होता. शेताच्या एका बाजूला कुळागराचा उभा पट्टा झोंपीं गेल्यासारखा वाटत होता अन् त्याच्या पायथ्यानं वाहणाऱ्या ओढ्याची अस्पष्ट खळबळ कानाला सुखवीत होती. मीं थोडा वेळ रात्रीचं हें वैभव न्याहाळून पाहिलं अन् तिथली गार हवा सोसेनाशी झाल्यामुळं गोधडींत अंग लपेटून डोळे मिटले.

मध्यरात्रीच्या सुमारास माळ्याच्या मेढी गदगद हालल्यामुळं मीं दचकून जागी झालें. उठून बसणार तोंच यांचं तोंड दिसलं. तो धान्या नाहीं हें पाहून माझा जीव खालीं पडला. मी अवाक्षर न बोलतां परत निजून राहिलें. हे सरकत सरकत माझ्या शेजारीं येऊन बसले. पोफळीच्या कांबी हारीनं मांडून तयार केलेल्या त्या माळ्याची रुंदी पुरती एक हातसुद्धा नव्हती. त्यामुळं त्यांना अंग चोरून बसावं लागत होतं. गोधडी पांघरलेल्या माझ्या पाठीवरून हे हात फिरवूं लागले. थोडा वेळ दोघांचींहि तोंडं बंद होतीं. मीं वाचा विटाळीत नाहीं हें पाहिल्यावर यांनींच तोंड उघडलं.

"आज कां तूं रागावलीस एवढी? तुला माळ्यावर यायचं काय कारण होतं सांग बरं!" यांनीं माझे दोन्ही हात पांघरुणांतून बाहेर काढून आपल्या हातांत घेतले. माझ्या मुखमुद्रेकडे निश्चल दृष्टि लावली. मला त्या वेळीं वाटलं, नवरेपण ही चीज या माणसाच्या अंगीं थोडीबहुत तरी

असावी! या असंस्कृत, बावळया हृद्यांत बायकोविषयींचं प्रेम अगदींच झोपलेलं नसावं. नाहींतर अशा अपरात्रीं हे कशाला आले असते माळ्यावर? अन् या अस्फुट जाणिवेनंच मला रडूं कोसळलं अन् मी माझी मान उचलून असहाय्यपणें यांच्या मांडीवर टाकली. माझे दोन्ही बाहू त्यांच्या कमरेभोंवतीं आवळले गेले.

" तूं कां आलीस माळ्यावर तें सांग." यांनीं पुनश्च तोच प्रश्न केला. आतां मला बराच धीर आला होता. मीं म्हटलं.

" तें धान्याला विचारा. तो आज माझा ग्रास घेणारा होता. मला माणसांतून उठवणार होता! तुमच्या तोंडाला काळं फासणार होता." असं म्हणून मीं यांना सकाळचा सगळा प्रकार सांगितला.

" हें बघ, धान्या मला मोठ्या भावासारखा आहे. त्यानंच माझा पडता संसार सावरला आहे. तेव्हां त्यानं एखादी आगळीक केली म्हणून आपण त्याच्यावर रागवतां कामा नये."

मला वाटलं होतं, हे धान्याचं सगळं सहन करीत असले तरी ही गोष्ट सहन करणार नाहींत. यांच्यांतला पुरुष फुंफाटत जागा होईल. यांचा ओठ दांतांखालीं रगडला जाईल. भुवयांची कमान करडी होईल. पण या सगळ्याऐवजीं हे पडखाऊ, पोचट शब्द यांच्या तोंडून ऐकतांच मला यांची शिसारी आली. नखापासून तों केंसांपर्यंत एक तिडीक उठली!

" तुम्हीच का हें बोलतां?...नवरा आहेस का हैवान आहेस? चल हो दूर माझ्याजवळून!"

मीं यांना अभावितपणें दूर ढकललं. दुसऱ्याच क्षणाला 'मेलोंऽऽ' असा शब्द उमटला अन् यांचं गाठोडं दीड पुरुष उंचीवरून शेतांत कोसळलं. आम्ही माळ्यावर आहोंत अन् माळा अगदीं निरुंद आहे याचं मला त्या वेळीं भानच राहिलं नाहीं. शपथेवर सांगतें कीं, यांनीं पडावं म्हणून मीं यांना मुळींच ढकललं नव्हतं. नकळत ती गोष्ट घडून आली

होती. ती ओरड अन् तो धप्प आवाज ऐकून बसल्या जागीं मी लटलटूं लागलें होतें. माझ्या गात्रांना खालीं उतरण्याचंसुद्धा त्राण उरलं नव्हतं.

'यांचा हातपाय मोडला असेल का? पाठीला मार लागला असेल का छातीला? काय झालं असेल यांचं? अन् काय होईल?' असले अनेक भयंकर विचार माझ्या डोक्यांत गर्दी करून उठले होते.

'काय झालं' म्हणून शेजारचे माळेकरी धावून यायच्या आंतच एका माणसानं आखाड्यावरून उडी घातली अन् जवळ येऊन यांना उठवलं. धान्या होता तो! मी परत एकदां चमकलें. 'म्हणजे हा आमच्या पाळतीवर होताच तर!'

"धान्याऽऽ! मला बायकोनं ढकलून दिलं रेऽऽ!" माझ्या कुंकवाच्या धन्यानं गळा काढला.

"गेला होतास कशाला झक मारायला तिच्याकडे? ती गोऱ्या कातडीची, घाऱ्या डोळ्यांची बया तुला नाहीं वठणीवर यायची! त्या कामाला मीच पाहिजे." धान्या म्हणाला.

माझ्या मनांत त्या वेळीं काय आलं असेल?

कुंवार मुलीला घरांत ठेवून घेणं दादांना जड वाटलं. विधवा मुलीला तरी त्यांचा आसरा मिळेल का?

* * *